संगीत

# स्थानिक-स्वराज्य

अथवा

# म्युनिसिपालिटी



कै. माधव नारायण जोशी



१९४९

रावबहादुर

# लक्ष्मण जनार्दन आपटे

बी. ए., एल्एल्. बी.

प्रेसिडेंट, शहर म्युनिसिपालिटी, पुणें.

यांस :—

साष्टांग नमस्कार विनंति विशेष,

प्रस्तुत नाटक लिहून तयार झाल्यानंतर त्यांतील कित्येक प्रसंग आणि पद्ये आपणांस निवेदन केलीं. त्याबद्दल आपल्या नेहमींच्या खुल्या दिलानें आपण आपली पसंती व्यक्त केली; इतकेंच नाहीं तर, मी नाटकांत जे घोटाळे आणि अनिष्ट प्रघात वर्णन केले आहेत, ते कांहींच नव्हत त्यापेक्षां अधिक घोर आणि निंद्य प्रकार जागोजाग नजरेस पडतात असें आपण मला सांगितले; त्यावरून नाटकरूपानें हें सर्व लोकांपुढें मांडले तर लोकशिक्षणास मदत होईल असेंही आपण बोलून दाखविलें हल्लीं नाटक तयार झाल्यावर आपणांस तें समर्पण करावें, असें माझ्या मनांत आलें. आपला सरळ, गोड स्वभाव, निस्पृहता, सार्वजनिक कामात पक्षभेद मनांत न आणितां कार्यसिद्धीकडे लक्ष ठेवून वागण्याची पद्धति इत्यादि गुणांवर लुब्ध होऊन ही परवानगी मी मागितली आणि आपण ती उदारपणें दिली. सांप्रत हें नाटक अत्यंत आदरपूर्वक आपणांस समर्पण करीत आहे त्याचा स्वीकार व्हावा. कळावे, ही विनंति.

पुणे,
ता. १ जून, १९२५

आपला नम्र,
**माधव नारायण जोशी**

## कै. माधवराव जोशी यांचीं

## — रंगभूमीवर आलेलीं नाटकें —

१ संगीत **प्रेमगुंफा**
२ ,, **पद्मिनी विलास**
३ ,, **प्रेमसागर**
४ गद्य **कर्णार्जुन**
५ संगीत **कृष्णविजय**
६ ,, **विनोद**
७ ,, **मनोरंजन**
८ गद्य **करमणूक**
९ संगीत **आनंद**
१० ,, **म्युनिसिपालिटी**
११ ,, **हास्यतरंग**
१२ ,, **वऱ्हाडचा पाटील**
१३ संगीत **वशीकरण**
१४ ,, **विश्ववैचित्र्य**
१५ ,, **प्रो. शहाणे**
१६ ,, **सत्वसाफल्य**
१७ ,, **गिरणीवाला**
१८ ,, **पुनर्जन्म**
१९ ,, **पैसाच पैसा**
२० ,, **प्रेमळ लफंगे**
२१ ,, **मोरांचा नाच**
२२ ,, **उधारउसनवार**
२३ ,, **नामधारी राजे**

१ [ अपूर्ण ] **बोर्डिंग रोमान्स** ( भिमाताई )
२ [ अपूर्ण ] **राजा उदार झाला** अथवा **प्रांतिक स्वराज्य**

---

# प्रस्तावना.

मराठी रंगभूमीच्या आश्रयदात्यांच्या आज कित्येक वर्षें चांगले परिचयाचे झालेले नाटककर्ते रा० रा० माधव नारायण जोशी, हे पुनः एकवार आपल्या रसिक आणि मार्मिक श्रोतृवृंदापुढें आपली नवी कृति मांडीत आहेत. हल्लीं आपणांस स्वराज्याचे सर्व अधिकार मिळाले पाहिजे आहेत, इतकेंच नाहीं तर ते यापूर्वींच कित्येक वर्षें मिळावयास पाहिजे होते, अशी सर्वतोमुखी मागणी सुरू आहे. अशा वेळीं स्थानिक स्वराज्याचा जो अल्पस्वल्प अधिकार आज चाळीस वर्षें मिळाला आहे त्याचीं कामें आपण कितपत नेकीनें आणि हुषारीनें पार पाडीत आहों, तें आपलें आपणांस कळावें, म्हणून रा० जोशी यांनीं आपणांपुढें हा एक आरसा मांडला आहे. अर्थात् त्यांचा हेतु स्तुत्य आहे यांत संशय नाहीं. आतां स्वराज्याच्या अधिकाराची पात्रता आपल्या म्युनिसिपालिट्या आणि लोकलबोर्डें यांच्या चोखपणावरच केवळ ठरविली पाहिजे असें नाहीं. स्थानिक स्वराज्यसंस्थांतून काम करणारे लोकच स्वराज्याच्या भावी हक्कांचे चालक होतील असा कांहीं नियम सांगतां येत नाहीं. कदाचित् हल्लीं आपल्या ग्राम-पार्लमेंटांत झळकणाऱ्या लोकांच्या चुकांकडे आणि गोंधळाकडे पाहून सध्यां बाजूस बसलेले अधिक चांगले लोक पुढें येतील, आणि आपल्या वाढत्या जबाबदारीचा बोजा शिरावर घेतील असाही एक संभव आहे; पण अशा प्रकारें अधिक चांगल्या लोकांनीं पुढें यावें म्हणून तरी आपल्या स्थानिक-स्वराज्याची हल्लींची दैना लोकांपुढें नाटकरूपानें मांडणें अवश्य होतें यांत शंका नाहीं.

गेल्या चाळीस वर्षांचा स्थानिक-स्वराज्यसंस्थाचा इतिहास स्थूलदृष्ट्या अवलोकन केला तर पुष्कळ सुधारणा झाली आहे असेंच म्हणावें लागेल. परंतु मतदारांचा वर्ग अधिकाधिक विस्तृत करण्याचें धोरण ठेविल्यामुळें पहिल्यापेक्षां कमी दर्जाच्या लोकांस कमिट्यांत निवडून येण्यास सवड झाली आहे. यामुळेंच रा. जोशी यांनीं वर्णिल्या प्रकारचे सभासद निवडून येतात, आणि आपल्या कृतींचे पोवाडे गाण्यास कवींस संधि देतात. या नाटकांत वर्णन केलेले सर्व

अनन्वित प्रकार कोणत्याही एकाच शहरांत एकाच वेळीं पहावयास मिळतील असें नाहीं, तथापि कवीनें अतिशयोक्ति केली आहे, किंवा असंभवनीय चित्र रेखिलें आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. सुशिक्षित आणि अशिक्षित या दोन्ही प्रकारच्या लोकांस, या नाटकाच्या द्वारें, आपआपल्या कर्तव्यास जागा असा नाटककर्त्यानें इषारा दिला आहे, याबद्दल रा० जोशी यांस धन्यवाद दिला पाहिजे.

या नाटकांतील पद्यें अलिकडच्या इतर संगीत नाटकांतील पद्याप्रमाणें रागदारींत गवई थाटानें गाण्यासाठीं तयार केलीं नाहींत, आणि त्या पद्याप्रमाणें निरर्थकही नाहींत हें फार चांगलें आहे. सामान्य जनतेच्या मनांत घोळ-ण्यास आणि त्यांना अर्थबोध होण्यास पोवाडे वगैरे अनुभवाच्या कसोटीस उतरलेल्या जुन्या वृत्तांचाच कवीनें आश्रय केला आहे. दुसरी गोष्ट ही कीं, या नाटकांत अश्लील, अमंगल किंवा उपमर्दकारक भाषाप्रयोग टाळतां येतील तितके टाळण्याचा ग्रंथकर्त्याचा प्रयत्न आहे. खऱ्या विनोदास या गोष्टींची गरज नाहीं हें या नाटकांत वारंवार प्रत्ययास येते. या बाबतींत नाटककर्त्याचें अभिनंदन करावयास पाहिजे. शेवटीं रा० जोशी यांना आतांपर्यंत जें यश मिळालें आहे तें या नाटकासही मिळो अशी इच्छा दर्शवून ही प्रस्तावना पुरी करितों.

६७८ सदाशिव पेठ, पुणें
ता. २९ मे १९२५.

वि. रा. जोशी

संगीत

# स्था नि क–स्व रा ज्य

अथवा

# म्यु नि सि पा लि टी

## ईशस्तुति

मंगला माधवा चरणिं करि वंदना ।
पामरा–करिं घडवि देशसेवा ॥ध्रु०॥
हीनबल स्वजन हे बापुडे जाहले ।
कोण तुजवीण घे कैवार देवा ॥ १ ॥
भयद कालें पहा अंत अति घेतला ।
कालनिर्माणका धाव देवा ॥ २ ॥
हिंदभूमीजननि सौख्यहितसाधनीं ।
वाटो विसावा दे भाव जीवा ॥ ३ ॥

**सूत्रधारः**—झाली इतकी ईशस्तुति पुरे झाली. अलीकडे तो परमेश्वर स्तुतीला अगदीं कंटाळला आहे. कारण जो पहावा तो आपला नुसत्या स्तुतीला कंबर बांधून तयार झालेला दिसतो आपण माणसामाणसांत जशी आपमतलबी स्तुतीची धूळ फेकतों तसाच धूळ टाकण्याचा प्रसंग जेव्हां देवावरही आपण आणला तेव्हां त्या बिचाऱ्यानें डोळे मिटून आमच्या स्तुतीला कान बंद करून घेतले. आतां नुसत्या तोंडाच्या स्तुतिरूप बडबडीला तो भीक घालीनासा झाला आहे. त्याला वटवट नको आहे. काम पाहिजे आहे. चल तर, प्रथम कार्याला प्रारंभ करूं आणि कार्य करीत असतां त्यांस यश देण्याविषयीं त्याची करुणा भाकूं.

**नटीः**—कोणच्या कार्याला सुरवात करायची आणली आहे मनांत? कार्य तर कळूं दे प्रथम मला?

**सूत्रधारः**—व्यर्थ, व्यर्थ माझ्या सहवासांत दिवस गेले तुझे! जरा समोर पहा! पाहिलेंस, आम्रमंजरींनीं अलंकृत झालेल्या वृक्षावर जसा कोकिलाचा थवा बसून त्यांचा मंजूळ स्वर ऐकूं येतो, किंवा सरोवरात प्रफुल्लित कमलांवर जसा मधुकरांचा गुंजारव कर्णमधुर वाटतो, तसाच या रंगभूमीला वेढून टाक-लेल्या मार्मिक, रसिक आणि सद्‌हृदय प्रेक्षकसमुदायाचा गोगाट ऐकून तुला कोणच्या कार्याला प्रारंभ करावयाचा, याची नाहीं का कल्पना येत? पाहिलास का किती आतुरतेनें हा समुदाय प्रारंभाची वाट पहात आहे!

**नटीः**—हे पहा मी तुम्हांला थोडें स्पष्ट बोलते, राग नको त्याचा यायला! कायहो, तुम्हांला पुन्हां एखाद्या नाटकाची अवदसा आठवली वाटतं? त्या 'विनोदाचे' आणि 'आनंदाचे' झाले तेवढे धिडवडे पुरे नाहीत का झाले? काय नि काय! काहीं बाकी ठेवलीका लोकांनीं म्हणायची?

**सूत्रधारः**—पण लोकानीं कांहीं बाकी ठेवलीका येऊन पहायची? अग हें चालायचेंच! एक मनुष्य सगळ्या जगाला कसा खूष करणार? हे पहा मी कांहीं दहापांच सोवळ्या टीकाकाराच्याकरितां नाटक करीत नसतो. मला त्यांच्याविषयीं मनांतून आदर आहे, त्यांच्या उदात्त आणि सात्त्विकपणाबद्दल मला कौतुक आहे, पण सांप्रतच्या परिस्थितींत त्यांचे ऐकावयाची सोय नाहीं! झालीस वाटतें टीकाकारांना सामील? मोठा जुलूम आहे बुवा तुम्हां सोंवळ्या लोकांचा! अगदीं नाकावर माशी नाहीं बसूं देत तुम्हीं?

**नटीः**—समजलें! उगीच वितंडवाद येथें कशाला? जगाचा मुख्य धर्मच जर वैचित्र्य आहे तर तुमच्या व माझ्या आवडींत व रुचींत वैचित्र्य असणें स्वाभाविक आहे. सांगा तर आतां कोणच्या कार्याला प्रारंभ प्रथम करावयाचा तो! तुमच्या नाटकाचें नांव तरी काय आहे?

**सूत्रधारः**—माझ्या नाटकाचें नांव स्थानिक स्वराज्य अथवा आमची मुनिसिपालिटी. हें पहा छापील पुस्तक.

**नटीः**—म्हणजे! इतक्यांत छापून देखील टाकलेंत वाटतें? धन्य आहे बाई तुमची! कथानक तरी काय आहे?

**सूत्रधारः**—कथानक होय? शेंकडों कथानकें आहेत त्यांत!

**नटीः**—पण सगळीं कथानकें मूळ कथानकाला धरूनच आहेत ना?

**सूत्रधारः**—अग तर! मुख्य प्लॉट मुनसिपालिटी स्वतःच आहे; त्यालाच अनुलक्षून सर्व प्रवेश आहेत!

**नटीः**—पहा पुन्हां रागावलांत! तुम्ही माझ्या म्हणण्याचा अर्थ नाहीं समजलांत! तुमच्या नाटकाचा हेतु काय?

**सूत्रधारः**—एक तर! सध्यांच्या काळीं आमच्यांत राजरोस वावरणाऱ्या काहीं आपमतलबी, दांभिक, भोंदू लोकांनी घातलेला धिंगाणा चांगला चव्हाट्यावर आणून त्याचा चांगला खरपूस समाचार घ्यावयाचा! त्याचा स्वार्थसाधु स्वैरसंचार जगाला दाखवायचा! निर्भीडपणानें, निस्पृहतेनें व कोणच्याही विवक्षित व्यक्तीला अनुलक्षून न लिहितां त्यांच्या स्थानिक स्वराज्याचा धुडगूस अशा रीतीनें जगास दाखवावयाचा कीं तो पहात असता ते या रंगभूमीच्या आरशात आपले आपल्यालाच हंसण्यात दंग होऊन जातील! मग घरीं गेल्यावर खुशाल त्यांनीं नाटकाचा सारांश, कथानक, हेतु याचा निवांत विचार करावा!

**नटीः**—एकंदरीत तुमच्या कल्पनासाम्राज्यांत सरसकट बारा टक्केच आहेत म्हणायचे? चांगला नाही, वाईट नाही, सज्जन नाहीं, पंडित नाहीं; जो येईल तो भरडून काढायचा उपहासाच्या जात्याने?

**सूत्रधारः**—तूं अजून मूळपदावर आहेसच! अग वेडे, मूर्खांचा, दांभिकांचा उपहास करणे म्हणजे पर्यायानें आपोआपच सद्‌गुणांचा परिपोष केल्यासारखं नाहीका होत? म्हणे सरसकट बारा टक्के! असें कसे होईल? शक्य तरी आहे का? या ठिकाणीं, या वेळेसच, या रसिकवृंदांतच असे थोरथोर राष्ट्रभक्त, स्वार्थत्यागी, परोपकारी सत्पुरुष बसलेले आहेत कीं, त्यांची कितीही स्तुति केली तरी ती अपुरीच होईल! त्यांनीं केवळ राष्ट्रोद्धाराकरितां व लोककल्याणाकरितां इतक्या यातना, मानखंडना आणि हालअपेष्टा सहन केल्या असतील कीं, आमच्यासारख्या सामान्य जनांनीं त्यांचे उतराई होण्याकरितां आपल्या शरीराच्या कातड्याचे जोडे जरी त्यांच्या पायांत घातले, तरी त्यांचे उपकार फिटणार नाहींत! अशा माझ्या मायभूमींतील सज्जन

बंधुभगिनींचा उपहास माझ्या स्वप्नीं तरी येईल का? इतकेंच नव्हे तर, प्रिये—

**पद**

**मी सदा नमित या राष्ट्रधुरंधर विभुती ॥ पूजितों ध्यानिं मनिं चित्तीं ॥ ध्रु० ॥ औदार्य धैर्य नय नीति ॥ गुणवंत चतुर जे असती ॥ जे वदति तेंचि आचरती ॥ जनहितीं जन्म जे घेती ॥ १ ॥ मदमत्सर न शिवे चित्तीं ॥ ज्या स्तुतीं दंभिं ये खंती ॥ परसुखेंचि प्रमुदित होती ॥ ओवाळिन प्राण त्यांवरती ॥ २ ॥ आकाश जरी कोसळलें ॥ भूपतिनें करवतीं धरिलें ॥ सत्याहुनि अणु नच ढळले ॥ अनभिषिक्त भूपति व्यक्ती ॥ ३ ॥**

अशा व्यक्तींच्या पुढें कोण मान वांकविणार नाहीं? कळलेना माझें हृदय इत्थंभूत तुला आतां पुन्हा अडूं नकोस या मुद्दयावर!

**नटीः**- असाच जर तुमच्या हृदयात सज्जनांविषयीं आदर आणि भावना आहे तरमग माझें बोलणेंच खुंटलें! मी तुमच्या कार्यात सर्वतोपरी काम करण्याला अगदी आतुरतेनें तयार आहे, आज्ञा व्हावी!

**सूत्रधार**—ठीक आहे! जा तर आत, सर्व पात्रांची सिद्धता आहे कीं नाहीं तें पाहून ये जा. (ती जाते) चार डोक्यांच्या ब्रह्मदेवाची मनुष्य एक वेळ समजूत घालील, पण एक डोक्याच्या बायकोची समजूत पटविणे कठीण! आमची ही वळली तर सूत नाहीं तर—(नटी आदळ आपट करीत रागावून येते) या, आतां तुमचीच गोष्ट बोलत होतों!

**नटीः**—नाहींच जायची तुमची जन्माची संवय! म्हणे पात्रांची सिद्धता आहे कीं नाहीं ती पाहून ये! कमलीं कपाळाचीं पात्रें आलीं आहेत! आंतल्या बाजूला तर एक मेला मुकदम नि दोन महारणी बसल्या आहेत! कशाला हो ह्या मुकादमाला नि टवळयांना बोलावलेत तुम्हीं, नाहीं ते घरांत त्रिटाळ-चंडाळ कालवायला नि थेर थेर करायला! थांबा मी जाऊन त्यांना आत्तां हांकून देतें! अरे पांडू! अरे गणू! ओढा रे चांगल्या झिपऱ्या नि घाला चार केरसुण्या पाठींत!

**सूत्रधारः**—अग होय, होय, होय! पहा अडलीस पुन्हां याच जाग्यावर! अग, तो खरोखरीचा मुकादम नि त्या महारणी नव्हेत! अग, जसा देव तशीच पूजा बांधिली आहे त्यांनीं! मींच सांगितलें होतें त्यांना तसें रंगायला! ( हंसते. ) हा वेडे! इतकी फसलीस ना? मला सगळे स्वत:च्या कल्पनेच्या मालकीचे अगदीं नवीन पाहिजे! मला आपलें सत्तेचें घोंगडें आवडतें; दुसऱ्याची शालजोडी नको! मला दुसऱ्यांच्या काव्यकल्पना, कोट्या, भाषांतर, उतारे याचे ऋण काढून नाटकाचा सण पार पाडायचा नाहीं! माझें आपलें गरीबाचे सुदाम्याचे पोहेच का असेनात तेच मी या प्रेक्षक बांधवभगिनींना देणार आहे. चल तर, ती बिचारी पात्रें बराच वेळ रंगून बसली आहेत! त्यांच्या तोंडाचा रंग देखील तडतडूं लागला असेल! मुनसिपालिटी देवीच्या नमनाला सुरवात करायला त्यांना सांगूं! चल तर!

---

# अंक पहिला



## प्रवेश पहिला

[ स्थळः—रस्ता. पात्रेः—रंगराव, अंबू व गंगू. ]

**रंगरावः—**

पद [ चाल—केशवकरणी अघटित लीला० ]

नगरदेवते ! मुनासिपालिटे ! माधव तुज वंदन ॥ करितसे घालुनि लोटांगण ॥ जनमोहक तव अगम्य लीला सिंधूसम गहन ॥ थकले कवि वानुन गाउन ॥ ध्रु० ॥ थाटानें तूं पाट लाविसी दर तिन तिन वर्सानं ॥ करुनिया नगराचें मंथन ॥ शृंगारसुंदरे ! तूं वेल्हाळे ! काढिसि मग हुडकुन । नेमके नंदीचे नंदन ॥ कोणी हातिं तराजू धरी ॥ कोणी कापड विक्री करी ॥ कोणी नापिक खुंटावरी ॥ कोणी नित्य हमाली करी ॥ कोणी गुत्त्यांचे कैवारी ॥ कोणी विधवांचे चौधरी ॥ कोणी पदव्यांच्या हो भरीं ॥ खुशालचेंडू उडाणटप्पू यांवर गे भाळुन ॥ अर्पिसी यांस तनमनधन ॥ धूर्त सात्त्विक, ज्ञानी, पंडित, सज्जन, झिडकारुन ॥ धरिसी कां ठोंबे कवटाळुन ॥ १ ॥ पदव्या कीर्ति दांभिक मिळविति कितिक लाळ घोटुन ॥ प्रसंगीं घाण बूट चाटुन ॥ तनसाडिसाठीं नरडीलाहि देतिल नख लावुन ॥ जनहित यांचे मनिं कोठुन ? ॥ ग्रामव्यवस्था वर्णन करितां जाइल कालिदास भागुन ॥ तिथें मी काय अज्ञ मतिहिन ॥ यथाशक्तिनें वर्णन करितों ऐका लक्ष देउन ॥ जरि चुकलों घ्यावें सांभाळुन ॥ गटारें रस्त्यावरि वाहती ॥ धुराळा रोधित रविची गति ॥ कचरा लपवित पेट्यांप्रति ॥ बेडुक अळुखांचीं गर्जती ॥ पलटणी डांसांच्या धावती ॥ नाकांमधले केंस जळाले खमंग दुर्गंधिनं ॥ गेलें सॅनिटेशन उलथुन ॥

चोळांमध्यें बाळ गोपाळ बैसुनि करि कुतुहल रांगेन ॥ सुशोभित करिती रांगोळिनं ॥ २ ॥ तेल पळाविलें म्हणोनि विरही कंदिल करि मिणमिण ॥ गेले कितिक प्राण सोडुन ॥ मार्ग क्रमितां प्रलयकालच्या ऐशा तिमिरांतुन ॥ लोळती कितीक ठेचाळुन ॥ नरजन्मिच्च या शिंगें देशी नागरिकां लागुन ॥ बसविशी थोबाडें सुजवुन ॥ पाउस पडतां ढोंपर बुडती रस्त्यांत चिखलांतुन ॥ पडती नरनारी निसरुन ॥ धोतर पगडी लुगडें चुचडा तिनतेरा होउन ॥ उभयतां पोहति कवटाळुन ॥ करिती संध्या मेंबरनांवें पटपट मुखिं घेउन ॥ श्रापिती पोहत चिखलांतुन ॥ त्यांच्या बापा आज्या पणज्या त्रयिला संबोधुन ॥ टाकिती सहकुटुंब उद्धारुन ॥ ३ ॥ गढूळ रेंदा फिल्टर वॉटर टिपटिपि नळ गाळिती ॥ जैसा शंभू अभिषेकिती ॥ मजला वाटे हे नळ रडती ! केवळ तुझ्या नांवानं ॥ स्फुंदुन, स्फुंदुन, आक्रंदुन ॥ अचमन करतां हळूच मासा तळहातीं येउन ॥ बैसे विप्रोदरीं दडि देउन ॥ नाना रोगें जन पीडले ॥ प्लेगे ठाण सदाचें दिलें ॥ पटकिनें निशाण फडकाविलें ॥ नाडले मलेरियानें भले ॥ विषमज्वरही फोफावले ॥ गोवर, देवींना फावलें ॥ खोकले क्षयही सरसावले ॥ बापुडे लोक भांबावले ॥ एन्फ्ल्युएंझा तिखट जाहला कानामागुन येउन ॥ मेले असंख्य दुबळे जन ॥ डाक्तरची बेट्यांची पिकली ! गरिबांच्या पैशानं ॥ बसले मोटारी घेउन ॥ अनाथ गरिबें पटपट मरती त्राहित्राहि भगवन ॥ त्राताकोण तुजवांचुन ॥ ४ ॥ नगरदेवते मुनासिपालिटे ! माधव तुज वंदन करितसे घालुन लोटांगण ॥ धृ० ॥

झालें इतकें नगरदेवतेचें स्तवन पुरे झाले ! ठेवा तुमच्या या झांजा बाजूला आणि लागा देवतेच्या सेवेला ताबडतोब ! मी शहरसफाईची आणि घरोघर उंदराचे सांपळे पुरविले गेले आहेत कीं नाहींत त्याची तपासणी करून आलोंच ताबडतोब !

---

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ**ः—रस्ता, कंदील व कचऱ्याची पेटी भरलेली. ]

**गंगूः**—

**कुठवर पाहूं वाट सख्याची चंद्र कीग ढळलाजी ॥**
**माथ्यावरी ॥ अग अंबे अग अंबे—**

**अंबूः**—काय तरी तुझा गळा म्हनू! उतरलना मदन खालती! अग, आतां वाईच तोंड बंद कर कीं, आता रस्ता झाडशील का लावनीच म्हणशील: आतां थोडं राहलंया झाडायचं! आतां त्वांड बंद करून आटप बिगी बिगी.

**गंगूः**—माझं त्वांड बंद झालंया म्हणजे हातबी बंद पडतुया बघ! अंबे, माझं आक्शी मुनशीपालटीच्या लेंबरावांनीं हात नी त्वांड दोन्हीबी सुरू पाहिजे बघ!

**अंबूः**—म्हनजी कायग? मला नाही हेरलं अजून, वाईच समजून सांग तर खरं?

**गंगूः**—म्हनजी आपल्या गांवची मुष्टीपालटी आहेना? तथं जाऊनशान गांवांतल मोठमोठ दुकानदार शेठसावकार लोक त्वांड करतात ना? आन हातानंबी लोकांचा पैका दाबतात ना? तस्स, रात्रंदिवस माझ हात नी त्वांड सुरू पाहिजे बघ! तीकतं मोठ्या लोकांचं लांब कशाला, अग, आपला रंगोबा, मुकादम, ज्याच्या त्याच्यापासून चंची मागून बकरीवानी तोंडानं चरतोया, आन हातानं मजुरांच्या खोठ्या हजऱ्या लिहूनशान पैकाबी दाबतोया, हिंग असं!

**अंबूः**—अवकळा, लयी द्वाड हैस! तुला अक्शी समदं राजकारूण कळ-तंया! आन कुठं शिकलीस इतकं ग्यान?

**गंगूः**—कुठं म्हनजे! ह्या गांवांतल्या समद्या शाळा मीच झाडत्यें नव्ह का मुष्टीपालटीच्या?

**अंबूः**—तवाच तुझा नवरा रांड टाकून गेलाया तुला! आन त्यो साव-काराचा पोरगा होता ना तुझ्या मागं? कायग मंग पोर कुठं आहे तुझं आतां? पांजरपोळांत सोडलंस व्हय?

**गंगू:**—म्हनजी! तेच्या बाला मी सोडतें व्हय! एक दिस नेलंकी त्येच्या घरीच आन दावलं त्येच्या बाला! तवा घाबरला सावकार न् काय? प्वार घेतलंन ठेऊनशान् त्येनं! आज पाच वर्स झाली मला पंधरा रुपये पोटगी देतोया गुपचूप. त्ये रस्त्याला झाडायची पाळी असली म्हणजे नंदर पडतंया कधीं कधीं! अक्शी कसं हिऱ्यावानी हाय पग! प्वार पन् प्वार लाखांत प्वार हाय बघ! हत योकबी नंदर पडत नाहीं बघ तसं!

**रंगराव:**—गंगे, तोंड बंद कर! चल हात चालू दे बिगी बिगी!

**गंगू:**—चाललंया नव्हका, बरं झालं लौकर आलास! मीं म्हन्तलं, कुठं उंदराच्या सांपळ्यांनच अडकून पडलांत! कारं रंगराव! आज आठवण झालीया व्हय ह्यो रस्ता झाडायची तुम्हास्नी?

**अंबू:**—आज दोन वर्सात कुनी हकडं आलं असल तर शपुत?

**गंगू:**—कारं रंगराव! आजच, आजच कुठला उमाळा फुटलाया तुम्हासनी ह्यो रस्त्याचा?

**रंगराव:**—तुला काय करायच्या चांभारचवकशा नाहीं त्या! झाड म्हटलं झाडावं!

**गंगू:**—आम्ही चांभारचवकशी करतोंय? का तुम्ही करतां? आज दोन वर्सांत न झाडलेला रस्ता तुम्हीं आम्हांसनी झाडाया हुकुम दिला; तवा या रस्त्याची चांभारचवकशी हमीं केली का तुम्हीं?

**रंगराव:**—अग, आज या रस्त्यांनीं कलेक्टरची का गव्हर्नरची मोटार जाणार आहे, असं कळलं तेव्हां डाक्तरनीं हुकूम दिला ताबडतोब केरकचरा धुराळा साफ करून सूर्योदयाच्या आंत पाणी शिंपडायचा! म्हणून तुमच्या घरीं मोठ्या पहांटेस आलों तडफडत, नाहीं तर माझं काय अडलं होतं? पेशवाईत नव्हता बोवा असा कधीं त्रास गव्हर्नराचा नी कलेक्टराचा?

**गंगू:**—कारे रंगराव! कोन कलक्टुर कां गंवडूर कां कोन तुझा बा? इकडून मोटारींतून जानार म्हणतोस त्येची मोटार भुररर् फुसकन् इकडून जानार तिकत्यीमंदीं त्यास हतला कचराबी दिसतुया धुरळाबी लागतुया व्हय? त्यो तेवढा मानूस हाय् आन् हातलीं समदीं माणसं काय जनावरं हायती व्हय? त्येसनी कांहीं धुराळान् कचरान् घान नाहीं का?

**अंबूः**—त्येसनी कांहीं नाक नाहींती व्हय घान यायला ?

**गंगूः**—तीं काय समदीं गाढव हायती व्हय् कचऱ्यांत लोळायला ?

**अंबूः**—त्यांसनी काय डोळे नाह्यती व्हय खांच खड्ड्यांतून चालायला ?

**गंगूः**—त्येसनी काय शिंग शेपटी फुटलीया असंच दोन वर्स रहायला ? लई कांगाव करतोयूस तुझ्या बाचा !

**रंगरावः**—अग, आम्हीं काय नुसते हुकुमाचे ताबेदार ! तिकडे डाक्तरचं आणि मेंबरांचं काय गौडबंगाल असतं तें आम्हांला काय कळणार ! त्यांनीं हुकूम दिला आम्ही बजावला ! ( इतक्यांत एक बाई कचरा पेटींत न टाकतां जवळ टाकते ) आतां काय करावं ! अहो त्या पेटींत टाका ! भलती-कडेच काय टाकतां ?

**गंगूः**—आं चांगली शानी सुरती दिसतीसया आन शनपन कुठं तिरथ-यात्रेला पाठवलंस व्हय ? आतां काय म्हणावं तरी बाई ह्येसनी ! टेहळून काय पाहतीस ? डोळे नाह्यती व्हय पेटींत टाकायला ?

**बाईः**—ए बाई, तोंड किती करतेस ! सगळ्या गांवांत असाच टाकतात कचरा ! काय ग बाई तोंडाळ तरी ! हें मोलमजूर अलीकडे भारी उर्मट झाले आहेत ! अगदीं ताळतंत्र सोडलाय् मेल्यांनीं !

**रंगरावः**—अहो बाई, तुमच्यावर खटला भरला जाईल आत्ताच्या आत्तां !

**बाईः**—जा, खटला भरीव नाहींतर तिकडे कोर्ट भरीव !

**गंगूः**—तूं मात्र संमदा रस्त्या भरीवलास कचऱ्यानं आन् पोराच्या कागदानं, हाय तरी कुनाचं ह्यो घर ?

**बाईः**—वराहशास्त्रीबुवांचं आहे समजलीस ! भर रे मेल्या खटला, ही मी उभी आहें ! चावट कुठले ! [ जाते.

**रंगरावः**—जा बाईसाहेब, तुम्ही जा ! जा ! जा ! गंगे काढून टाक ! अग नशीब समज ! नुसता कचरा नी कागदाचे बोळेच टाकले ; आणखी नाहीं कांहीं टाकलें ! नाहींतर अडकून पडलो असतों पंचनाम्यांत इथल्या इथेंच अग हा वराहशास्त्री मानेजिंग कमिटींतच आहे ! नाहीं तें लचांड उपस्थित

होऊन सकाळच्या प्रहरींच पोटावर पाय यायची वेळ आली होती! असं नव्हतं बुवा आमच्या पेशवाईत! बरं चल! ए अंबे! दमलीस फार, चल, तें राहूं दे!

[ एक ब्राह्मण पुन्हां कचरा बाहेर टाकतो व तोंडानें 'शांताकारं भुजगशयनं' म्हणतो. ]

**अंबूः**—आं! आतां काय म्हनूं तरी ह्येसनी! आज काय समदं येड्याचं इस्पिताळ मोकाट सुटलया व्हय? अरे टेहळून काय पगतोस! डोळे नाहिंती व्हय पेटीत टाकाया! आं! काय रे!

**पद**

**सांग हत कशाला ठेवलीर पेटी?॥ डोळा काढून कुणा दाविसि ही दमदाटी ॥ धृ० ॥ अंब केळ्याची सालपट करटी॥ लगान मुंजीचीं काढून खरकटीं॥ शेणगोळ्याची आली तशी भरती॥ काय हत रडल मुनसिपालिटी!॥ १ ॥**

**गंगूः**—निघ! मानुस हैस की जनावर हैस मेल्या!

**रंगरावः**—पुन्हां पाहिलें तर तंगडीच मोडीन बघ! बरी बरी खोड मोडलीस बेट्याची! ये! इकडे अशी! जरा काढ बघूं! आणली हैस का? चुनेगची!

**अंबूः**—चंची व्हय! आन् ती कशी विसरन्! आन् तुम्ही कशाला तसदी घेताया? मीच लावून देतें तुम्हास्नी? आतांशीं रंगराव तुम्ही अगदींच विसरलांत गरीबास्नी!

**गंगूः**—आन् माझ्या घरींबी नाहीं आलांत या सहा महिन्यांत तमाखु खायला?

**अंबूः**—( पान लावीत असतां म्हणते ) आज मोठ्या पाहाटस हकड येतांना कोंडीबा सलूनवाला हायना? तो मोठा मेंबर? त्येच्या घरीं चाललं होत गानं त्या चंद्राजीचं, त्येच्या मेव्हन्याला कंन्ट्राट मिळालं म्हून मुष्टीपालटीचं!

**गंगूः**—अक्शी समदं कसं दारूनं लालबुंद होऊन उल्लू झालं होत पहा! आन् तीबी रांड चंद्री दंताडी कशी ताना मारून काळीज तोडीत होती पगा त्येचं! "अहो माथ्यावरी चंद्र कीं हो ढळला जी"

**अंबूः**—हं हें घ्या पान!

**रंगरावः**—अरेइच्या असं काय! तरी आपले ते दादासाहेब रडतोंडे, डाक्तर बचनाग, तो रुस्तुमजी थापाडिया आन तो लंबेअल्ली मुरगीखां तो गटुलाल तिकडे झुकले होते! असं काय चालायचंच! असें कांहीं तरी मुनसीपालटींतलं अवदान किंवा घबाड सांपडलं कीं जलसे ठरलेलेच! काय विडा रंगलाया तुझा अंबे!

**गंगूः**—अक्शी जोड्याच्या तोडांत मारतुया तुझा दांताचा रंग! आं आन् ह्यो कोण?

**अंबूः**—व्हय् व्हय् त्योच तो! तुझा शेख हुसेन! काल घोड्याच्या शर्तीतून आनला असेल पैका तुला देया पाई! बघ कसा आपल्या नादांतच झुकत झुकत येतोया!

(शेखहुसेन चपराशी कमरबंद बिल्ला लावून एक फाईल, हंडीकॅप व हुक्का ओढीत येतो.)

**शेखः**—यारो सच कहताहूं शर्यत खेलो! जान गई तो पर्वा नहीं! जोरु गई तो पर्वा नही! नोकरीकीतो ऐसीतैसी; लेकीन वो नसीबके कसोटीपर एकदफा तोभी जाकर आपना सर मलो. एकदिन नसीबका चक्कर फिर जायगा! आज पंधरा बरस कसम है बाबांजानकी, अगरचे कुरानेशरीफ पढाहूंगा या सुना हूंगा! मेरे बाबाजान चचाजानकेभी नाम मैं भूलगया, लेकीन ये 'दिलावर' 'शहाजादा' 'डनबार' इनकी पेडिगरी बरजबानी रखाहूं! मुजखानही! एक दिन नसीबका चक्कर फिरजायगा! क्या गुडाखु मजा दे रहा है, और क्या खुश बो फैल रही है, जैसाके मे इस्तंबूलके बगीचेमे सहल कर रहाहूं! ये कोन नजर आरहा है! हाय! हाय्! मेरी प्यारी गंगूजान! हायरे तेरे नखरेमें गरम मसाला! ये तो मेरा जान खा जा रही है! जैसाके चुवेका कलेजा बिल्ली दमदमाके चबाती है वैसा ही लौंडी आखोंके खंजीरसे मेरा कलेजा नोच नोचके खा जा रही है! अरे प्यारी गंगु जरा यहां तो आव!

**दोहा**

**हम तुम्हारें चेहरेपर मरते तुम क्यूं नजर चुराते हो ॥**
**गालोंकी शराब हमे पिलाकर तुम मस्त बनाते हो ॥ १ ॥**
**क्या चांदसा मुखडा तुम्हारा रंग जमाता है ॥**
**धुंगटमें इष्कका दर्या छलबलाता है ॥ २ ॥**
**पतली कमर लचक जायेगी क्यूं मटकते हो ॥**
**आंखोंके खंजीरसे मेरा कलेजा नोच खाते हो ॥ ३ ॥**
**अलबेली, बाकी, मखमली मुलायम, क्या भामिन है ! ॥**
**नही यार ! ये गांव के म्युनिसिपालटी की काली नागी है ॥४॥**
**आज तक कमेटीके मेडकियां और चूब्बें हजम किये हो ॥**
**क्या यार का खेंकडा भी निंगलनेका इरादा रखते हो ? ॥ ५ ॥**

**गंगूः**—अदुगर फेक तुझा हुक्का का बुक्का ! चोवीस घंटा कुडकुड करून-शान पानी पेतोस तवा ह्यो पोट का पखाल हाय ! माझं समदं घर भरवलंसकी मेल्या ह्यो गुडाखुनं, राखोड्यानं, आन् हुक्यानं ?

**शेखः**—अरे यार रंगराव ! तुमभी मजा कर रहेहो ! ठीक है ! अरे क्यों चिल्लाती है ये हुक्केशरीफके नामसे ! अबे प्यारी ! मे दिल्लीके तख्तकी बडेबडे मोंगल बादशाहोकी मालुम ! ये हमारे मुसलमानोंकी नशानी है !

**रंगराव**—मोठा लेकाचा दिमाख दाखवितो आहे. बादशाहीचा आणि मोंगलाईचा ! आम्ही काय लेका हिंदूनीं बांगड्या भरल्या आहेत होय ! हिंदूनीं बांगड्या भरल्या आहेत होय ?

**अंबूः**—जाऊन द्या कीं रंगराव कशाला उगीच हमरीतुमरी, भांडण नी झगडा !

**रंगरावः**—मला नाहीं आवडत नांवें ठेवलेलीं आम्हां हिंदूना ! सोड ग अंबे ! काय आम्हांला निशाणी नाहीं म्हणतोस होय ? ही पहा चंची ! ( अंबूच्या हातून हिसकावतो. ) ही पहा निशाणी आमच्या पेशवाईची ! ही पहा निशाणी आमच्या हिंदुपत पातशाईची ! ही पहा निशाणी आमच्या मराठेशाहीची !

**गंगूः**—व्हय् व्हय् ! योकानं हुक्का पिऊन आन योकानं पानतंबाखु खाऊन आपली इजार आन् धोतूरबी गमावलं त्येचि निशानी हाय खरंच !

**शेखः**—यार रंगराव ! क्यौं घुस्सेंमें आते हो ! सच ! ये मेरी गंगू सच कहती है ! जानेदो झगडा फिसाद, ये तो दिन हमारे मौलाना शरीफ और तुम्हारे गांधीतिलकशरीफ क्या कहते है ? के हिंदु और मुसलमीन दोनो भाई है ! और आपसमे झगडा करना ठीक नही है ! आव गले लगो !

**रंगरावः**—हां असं असलं तर ठीक आहे ! आमची मुळींच ना नाहीं !

**शेखः**—आव यंहा बैठेंगे और तुम्हारे पुरानमें कुरान ! और कुरानमें पुरान मिला देंगे ! लेवो, तुम. हुक्का पीवो और मै तुम्हारे चंचीमेका पान खाताहूं ! अंबे गंगू जरा पान तो बना ?

**रंगरावः**—म्हणजे ! चल हट ! पुराणांतलं वांग कुराणांत आणि कुराणांतलं कोंबडं पुराणांत घालूं म्हणतोस होय ! चल हट ! मी हा असा मराठेशाहीला नि पेशवाईला बट्टा लावणारा नाहीं.

**शेखः**—अच्छा तो जाने दे. झगडा कायकू और ! मुजाखा नहीं तूं मुरगा और मै बैगन अलग अलग बैठके खा जायंगे ! मै तुझे नहीं हात लगाऊंगा, फिर तेरेकू ईटाळ तो नहीं होगा ! ( दोघे बसून हुक्का ओढतात, पान खातात. )

**रंगरावः**—कायरे शेखहुसेन ! हें बगलेंत पोतडें रे कसलें आणलें आहेस?

**शेखः**—क्या करना यारो ! ये पेट जलानेके वास्ते नोकरी करना जरूर है ! ये आपने मुनसीपालटीकी कल एक ज्यादा मीटिंग है करके सब मबर-लोगोंके घरकू नोटीस ले गया था. येकतो ये नोटीस है, और ये मेरा प्यारा लखपतीका हंडिक्यॅप है ! प्यारी गंगू कल जरुर तेरे लिये 'दिलावर' और शहाजादा लगाउंगा ! परवा नही, एक दिन नसीबका चक्कर फिर जायगा !

**रंगरावः**—कायरे लेका शेख हुसेन ! नोटीस फिरवलीस म्हणतोस आन् ती तर कोरीच दिसते ! आन सह्या कुठें केल्या आहेत मेंबरानीं ?

**शेखः**—ऐसा कैसा होगा ? मै खुद हर एक मेंबरकें सामने नोटीस मीटिं-गकी पेश कीया और दस्तखतलीया हूं !

**रंगराव**:—अरे लेका! हा बघ कोरा आहे कागद आणि सह्या तुझ्या लखपतींच्या हंडिकॅपवरच केल्या आहेत! अरे तूं मुनसीपालिटीच्या मीटिंगला बोलावलंस का रेसीसच्या मीटिंगला?

**शेख**:—हां! ऐसी कैसी गलती हो गई भाई? मैं भूलके हुंडीकपही सामने रखदीया शायद! लेकीन वो गधोंनें आंख मूचकर दस्तखत कैसी कर-दीये भाई? तोबा! तोबा! येतो आफत आके पडी! हाय हाय! येतो नसीबकी खोपडी फुटनेकी नौबत आ पहूंची!

**अंबू**:—एक दिन नसिबका चक्कर फिरजायगा!

**शेख**:—अरे क्या मश्करी कर रहे यारो? चल भाई रंगराव! वो पांडोबा शिरस्तेदार तेरे पहिचानका है उसे जरा समजाके दुसरी नोटीस लिखवा लेयेंगे! क्या करना, नहीं 'तो नोकरी जायेंगी! आजतक डनबार, किलटोय, दिलावर को पांच रुपये लगाताथा! आज जैसाके नोकरीके लिये वो पांडोबा शिरस्तेदार कोही पांच रुपये लगा देतां हूं!

**रंगराव**:—अरे लेका पांच रुपये त्याला कशाला देतोस, लाव तुझ्या डनबारला! ह्या सह्या कापून दे नोटिशीला गोंदांनीं चिकटवून.

**शेख**:—सुभान अल्ला! तूने तो अच्छी हिकमत निकाली! इसी वास्ते मै हरमेश कहतांहु कि हमारे हिंदुभाई बडे अकलमंद और चलाख होते है! और नही तो हम्! अरबस्तानके अडमुठ्ठे हूंठ लंबेचवडे खडे है.

**रंगराव**:—चल बाबा! करतां काय!

**गंगू**:—ये शेख हुसन्या! आन् ही मोंगलाईची निशानी घाल कीं तुझ्या तोंडांत!

**अंबु**:—आन् ही पेशवाईबी घेऊ का माझ्या हातांत?

**रंगराव**:—तें कांहीं नाहीं, ओळीनंच झालं पाहिजे. पहिल्यांदा ही मोंग-लाई जाऊं दे, त्याच्या मागून ही पेशवाई, आणि येऊं दे त्याच्या मागून तुमची धिसाडघाई!

**शेख**:—अरे चलो जलदी! कदम बढाव. वो देख! कोंडिबा हजामके यहांसे जलसा बरखास्त होकर सब लोक इदरसे आरहे हैं!

## प्रवेश तिसरा

[ **कपिला** मास्तरणीचें घर ]

**कपिलाः**—जगाचें अंतिम रहस्य म्हणजे पैसा, आणि पैसा म्हणजेच जग ! आरोग्य, शक्ति, युक्ति, मान, सन्मान, औदार्य तसेंच सौंदर्य, ज्ञान लौकिक, या सर्वांचा जर कोणत्या एका शब्दांत समावेश होत असला तर तो शब्द म्हणजे पैसा. आणि या पैशाचा अभाव म्हणजेच दारिद्र्य, दुःख, अज्ञान, क्लेश, रोग आणि पाप. तो पैसा मिळविण्याच्या साधनांना मात्र आमच्यांतल्या कांहीं प्रतिष्ठित दुढ्ढाचार्यांनीं निरनिराळीं नांवें दिलेलीं आहेत. चोर, उचले, भामटे, दरवडेखोर, किंवा व्यापारी, अधिकारी, सेनापती आणि राजे, खरें पाहूं गेलें असतां एकाच मूळतत्त्वाची रूपांतरें आहेत. हेतु एकच तत्त्व एकच सारखेच धंदेवाईक, पण एकाचा लहान प्रमाणावर धंदा म्हणून तो निंद्य, आणि दुसऱ्याचा मोठ्या प्रमाणावर म्हणून तो वंद्य ! मला तर असें वाटतें कीं हे सर्व खगोल अंतराळांतल्या आणखी एखाद्या मोठ्या गोलासभोंवती हिंडत नसून ह्या लहानशा चिमुकल्या पैशाच्या गोलाभोंवतीच हिंडत आहेत. खरोखर बा धना—

### पद

**मोहना ! सख्यासुवर्णा ! करिसि सृष्टिसंजीवना । जीवां जीवना ॥ धृ० ॥ दुःखलोह स्पर्शुनि करिसि ॥ सौख्यमया कांचनराशी ॥ आधारभूत सकलासी ॥ करिसि मुक्त तापदाना ॥ पापा क्षालना ॥ १ ॥**

ज्याच्यामागें सर्व जग लागलेलें आहे, त्याच्यामागें मीही लागलें तर कसला आला आहे दोष ? पण बाई, धन आणि प्रेम–हरकत नाहीं, पाहीन प्रेमाचेही धनासारखेंच साधलें तर. हो, बरी आठवण झाली; आमच्या इंजिनियर कळसूत्रें, डॉ० बचनाग, चीफ आफिसर गायतोंडे, आणि प्रो० ठोंबे यांनीं सांगितलें कीं, कोंडिबा सलूनवाल्यांच्या इथला जलसा झाल्याबरोबर तुमच्या इथें पुन्हा चहा घेऊन मग घरोघर जाऊं. तशी जलसा आटपायच्या आधीं लगबगीनें घरीं आलें नी चहाचं आधण ठेवायला नथूला सांगितलें. अरे नथू ! ठेवलेंस नारे आधण ?

**नथूः**—होय, बारा कप ठेवले.

**कपिलाः**—बरं तर जा तिकडे. उकळी आली म्हणजे मला सांग.

[ कोकिला प्रवेश करते.

**कोकिलाः**—बरं झालं बाई, तुम्ही लवकर निघून गेलांत. जलसा झाल्यावर काय नि काय धिंगाणा घातला सगळ्यांनीं! तो मेला बाळासाहेब धुंद होऊन तिच्याजवळ जाऊन बसला काय! कपाळावर रुपया चिकटवला काय, कायनी काय. शेवटीं जगद्गुरु तस्तावर झोंकांडा खाऊन नखशिखांत भरला! असा गोंधळ घातला सर्वांनीं!

**नथूः**—आंधणाला उकळी फुटायच्या रंगांत आहे. चहा घालूं कां थांबूं थोडा वेळ?

**कपिलाः**—येतीलच आतां इतक्यांत मंडळी. आल्यावर मग चहा घाल हो! ( पांडोबा प्रवेश करतो. ) कोण हें! इश्श! या पांडोबा, कसे अगदीं बोलावल्यासारखें आलांत हो! बरें झालें; आज तुमची सर्व मालक मंडळी जमणार आहेत, तेव्हां कामावर रुजू व्हायच्या आंत सगळ्यांशीं तुमची सलगीची इन्ट्रोडक्शन अनायासेंच करून देतें.

**पांडोबाः**—फार मेहेरबानी आपली!

**कपिलाः**—बसायचें आपण! आमचें कांहीं खाजगी भाषण चाललेलें नव्हतें.

**कोकिलाः**—कायग कपिले! हा तुझा नवीन सरदार धेनुवल्लभ हा ग कुठें गांठलास कुबेर?

**कपिलाः**—अग, तो किनई एकदां आमच्या शाळेवरून मोटारींतून जात होता; तो बाई कावळा बसायला आणि डाहळी मोडायला एक गांठ पडली. अगदीं आमच्या शाळेच्या समोरच त्याच्या मोटारीला कांहीं अपघात झाला! त्याला कांहीं दुखापत झाली नाहीं पण मी आपली ताबडतोब तिकडे गेलें आणि विचारपूस केली, तशी त्यानंही माझी विचारपूस केली! ही कायती प्रथम भेटीच्या योगायोगाची गोष्ट!

**कोकिलाः**—असं का! काय ग, चांगला शिकला सवरलेला आहे का?

**कपिला**:– छेग! शिकण्यासवरण्यांत शंखोबा आहे! यःकश्चित लहानसा दांडी तराजूवाला होता, पण बाई त्याचं नशीब होतंना कुबेरासारखं! ही लढाई सुरू झाली नि निमित्त झालं! तो होता जातीचा जरा धाडशी आणि लटपट्या! इकडून तिकडून पैशाची थोडी जुळवाजुळव करून रंगाचा केला व्यापार! काय बाई म्हणतात ना, देव देतो त्याला आढं फोडून देतो! आज दहा वर्सांत तो कुबेर झाला! आधींच टारं त्यांत शिरलं वारं, त्याला कुणी सहज दारूचं पिकेटिंग पहायला नेला. तों गांवांत बभ्रा झाला कीं, त्यानंच पिकेटिंग केलं म्हणून! मग काय विचारतां? लागलीच गांवांत श्रीयुत देशभक्त झाला!

**पांडोबा**:—आजकाल श्रीयुत, दे० भ०, लो० मा० व्हायची प्रत्येकाच्या जिवाची धडपड चालू आहे, कारण या मायपोटांत वाटेल त्या प्रकारच्या मूर्खांना बेमालूम दडी मारतां येतें.

**कपिला**:—त्यांतून पडला तो पैसेवाला! एकदां पैसे मिळाले म्हणजे मग पदव्या, मान, सन्मान आणि शहाणपणा का तोटा आहे?

**पांडोबा**:—अहो, हात धुवून पाठीस लागतात पदव्या!

**कपिला**:—पण मनाचा मात्र मोकळा आहे बिचारा!

**कोकिला**:—अग म्हणूनच लौकर मोकळा व्हायचा संभव जास्त! पण अशाला का तूं अगदीं मुठींत आणून ठेवलास? आहेस बाई जहांबाज!

**पांडोबा**:—तो कुबेर मुठींत सांपडला म्हणून तर सगळे मुनसिपल शंकर सांपडले यांच्या हातांत! साहजिक आहे. अशा शंखोबांना जरा डोळेफोड नीटनेटके मनुष्य नांवाकरितां ओळखीचं असावंसं वाटायचंच! तितकीच त्यांची कीर्ति वाढते!

**कपिला**:—अग पण, आधीं होता वाघ्या मग झाला पाग्या! पण आपला त्याचा येळकोट कांहीं जाईना! तो फुरफुरला कीं लागलींच। लागला वेडेचार करायला! त्याला म्हणे आतां चांगल्या सुशिक्षित नागरिकांत मिसळण्याची हौस सुटली आहे. त्याला अगदीं हाय्यर सोसायटीचा जंटलमन बनायचं आहे.

**कोकिला**:—असं का! म्हणजे? पुन्हा बसला वाटतें धूळपाटीवर श्रीग करायला? मुनसिपालिटींत येतो म्हणतो कीं काय?

**कपिलाः**—अग! कर्माची कहाणी तर तीच आहे! नुसता मुनसिपल शंकरच नव्हे! अगदीं अगदीं नगरनंदी करा म्हणतो आहे! प्रेसिडेंट करा म्हणतो आहे!

**पांडोबाः**—हं कसंतरी पाठीला शेण लावून बैल म्हणा म्हणतो आहे झालं!

**कपिलाः**—आतां म्हणे त्यानं इंग्रजी शिकायला सुरवात केली आहे! सगळं सगळं शिकायला सुरवात केली आहे. अष्टौप्रहर खळ नाहीं मुळीं हातापायाला.

**कोकिलाः**—तूं कोणती कला शिकवते आहेस त्याला? कांहीं का विषय ठरेना, तूं नाहीं म्हणा कोणत्याही विषयाला अडून पडायचीस! तसं आमच्या सुईणींचं नाहीं ग! आमचा एक विषय म्हणजे आरोग्य, आणि त्याचेच सगळे प्रकार! तसं तुम्हां मास्तरणींचं नाहीं! तुमचे म्हणजे नाना विषय अन् नाना प्रकार! बाकी कपिले, ही वेळ आहे बघ तुझी आतां. अशा नंदीबैलाकडून आपलं जन्माचं कल्याण करणं म्हणजे कांहीं पाप नव्हे, ह्या राष्ट्राच्या शरिरांत हीं असलीं हुराळलेलीं श्रीमंत गाढवं म्हणजे चरबीचे संचय आहेत. यांतूनच चरबीचा फैलाव होऊन राष्ट्राचं पोषण होत! तो आहे सर्वस्वी तुझ्या वचनांत! चांगली कातरी चालीव! जसा कांहीं खिसा होता कीं नव्हता!

**कपिलाः**—तें आहे ग माझ्या पूर्ण लक्षांत! पण बाई, त्याची फ्रेंडशिप झाली हा एक आपला भोगच उभा राहिला आहे माझा! त्याच्या इथें वर्णी लावायच्या करितां जो तो माझं डोकं उठवतो आहे; या नोकरीमुळें सगळ्यांच्या तोंडावर तोंड नेहमीं पडायचं, रिकामा वाईटपणा यायचा झालं! आतां अगदींच कुणी गळ घातली, म्हणजे देतें झालं एक शिफारसपत्र खरडून, मग तिकडे तुम्ही मरा, काय वाटेल ते करा—अगबाई! मंडळी आली वाटतं!

**नथूः**—मग चहा घालतों तर अधणांत. [ जातो.

**कोकिलाः**—( स्वगत ) हेंच धेनुवल्लभाचं दान माझ्या फांशाला पडलं असतं तर! ही सोंगटी केव्हांच मुनसिपालिटीच्या पटांतून उठून गेली असती हं एकेकाचं नशीब असतं झालं. ( उघड ) तुम्ही रिसीव्ह करा सगळ्यांना, मी आंत सगळी चहाची व्यवस्था लावतें. [ जाते.

**कपिला**:—ठीक आहे.( प्रो. ठोंबे, चीफ ऑफिसर गायतोंडे, डॉ. बचनाग कोंडीबा न्हावी, गट्टुलाल मारवाडी, वगैरे येतात. ) यावें, यावें बसा !

**प्रो० ठोंबे**:—गुडमॉर्निंग, कपिलाबाई गुडमॉर्निंग !

**कोंडिबा**:—रामराम, रामराम.

**गट्टुलाल**:—जय गुपाळ, जय गुपाळ !

**कपिला**:—येवढें कांहीं संकोचित व्हायला नको. आपण ज्याची नेमणूक केलीत तेच हे पांडुरंगराव. अगदीं अगदीं आपल्यांतले आहेत हो. बसा. यांच्या देखत बोलायचालायला मुळीं देखील संकोच नको कुणाला.

**चीफ ऑफिसर**:—हें काय सांगायला का हवं ? तुमची शिफारस आणि अनाठायीं होणार ? कल्पनाच नको. बसा बसा. पांडोबा, तुम्हीही बसा. कसं काय प्रो० ठोंबे ! कसा काय झडला जलसा ?

**प्रो० ठोंबे**:—रियली आय से वुइ ऑल एन्जॉइड् दॅट जलसा !

**चीफ ऑफिसर**:—ओ ! सरटन्ली प्रोफेसर तुम्हांला नाहीं वाटत, डॉक्टर बचनाग ?

**डॉक्टर**:—ओ ! सरटन्ली, चीफ ऑफिसर गायतोंडे यांचें आणि माझें अगदीं एकमत आहे. छे छे, आज अगदीं दंताडीनें बहार केली बुवा ! केव्हां उजाडलें कळलें देखील नाहीं. का गट्टुलाल खरें कीं नाहीं ?

**गट्टुलाल**:—अरे भाई कांई बोल्या ! चांद्री दंताडीनें घणी मजा उडाइयो है. एषा घाणा हुयोडो है की भाई म्हारे तो प्राण निकल पडीयो है.

**कोंडिबा**:—अक्षि भार उडवली बघा !

**डॉक्टर**:—अहो, पण आमच्या कोकिलाबाई कुठें आहेत ?

**कपिला**:—त्या आंत चहाची व्यवस्था करीत आहे.

**प्रो० ठोंबे**:—मग अगदीं आरोग्याच्या नियमानुसार चहा होणार तर एकंदरींत !

**डॉक्टर**:—तें काय विचारायचं ? यांच्या शिक्षणाखालींच आहे तो ? आमच्या गांवांतल्यासारखं आरोग्य आणि शिक्षण हातांत हात घालून चाललेलं क्वचितच दिसेल !

**चीफ ऑफिसरः**—अहो हातांत हात घालूनच काय? गळ्यांत गळा म्हटलेंत तरी चालेल. याहीपेक्षां शहरसुधारणा केली असती हो! पण हे मेंबर-लोक आहेत ना जिथें तिथें अडमडायला! ( कोंडिबा व गट्टुलाल यांस ) अहं! तुम्ही आमच्यापैकींच! जो मेंबर पहावा तो आपला आम्हांलाच दमदाटी करतो! द्रौपदीला पांचांचीच छळणूक होती, पण या चीफ ऑफिसरच्या द्रौपदीला पंचवीस पांडवांची गांजणूक नेहमीं सहन करावी लागते. नेहमीं या पांडवांची गुलामी करण्यांत माझा अर्धा जीव होतो! शहरकाम करायला फुरसत मिळते आहे कुठें? एकेकाचा दिमाख, लहर आणि मानमरातब संभाळतां संभाळतां प्राण कासावीस होतो. बाकी आम्ही फार पंचायतींत जातच नाहीं म्हणा!

**डॉक्टरः**—बाकी तुम्हीं मोठे सावध आणि धूर्त आहांत बुवा चीफ-ऑफिसर! कायहो, तुम्ही त्या जकातनाकें आणि शाळेच्या रिपेरीला चार हजार रुपये उकळलेत? मी हजर होतों. मी मुळींच बोललों नाहीं त्यावेळीं.

**प्रो० ठोंबेः**—काय? मूळच्या दोन हजारांच्या इमारतीला चार हजार रिपेरी? आहे बुवा तुमच्यांत करामत!

**चीफ ऑफिसरः**—खुबी तर तिथेंच आहे. अहो, परवां थोरला रस्ता-रिपेरीला आठ हज्जार ठणकावले. नुसता दोन्ही बाजूंच्या गटारांतला गाळ रस्त्यावर पसरून रूळ फिरविला. क्यौं! याला म्हणतात काम!

**डॉक्टरः**—कायहो, खडीचें नांवही नाहीं?

**चीफ ऑफिसरः**—अहो या तीन शेंड्यांनीं खडींत नुसती मातीच दडपली होतीं. क्यौं, याला म्हणावं काम, का डॉक्टर?

**कोंडिबाः**—मंग तें कांहीं नाय, आनखिन येक दंताडीचा जलसा झडलाच पाहिजे, का गट्टुलाल? खरं का नाय?

**गट्टुलालः**—और एक चांद्रीणे, घागरा घुंगट पिणवाकर, ईशिईशि हातपांव हिलवाकर जलसा करवाणा जरूर छे! अरे कांई अचंबा करीयो हय्? आबात ईशि हसवाजीशी नही छे!

**डॉक्टरः**—आहे खरें बुवा! काय हो, तुम्ही ती म्युझिअमकरतां तीन मजली नुस्ती दगडी बिल्डिंग उठविली; त्याचे वरचे मजले तर अगदीं झक झाले! आतां तळमजल्यांत कसलें अजून काम सुरू आहे?

**चीफ ऑफिसरः**—ते होय? पहिले दोन मजले बांधून त्यांना शोभेसा मागाहून तळमजला उठवनों आहे!

**गट्टुलालः**—बष् बष्, धन्य है! धन्य है! आपणा चीफ ऑफिसर तो एषा जाणो की जेषा विश्वकर्मा है.

**कोंडिबाः**—व्हय् व्हय्, अक्षी बिरामदेव हाय, अक्षी बिरामदेव हाय!

**कपिलाः**—पण ब्रह्मदेवाचं नुसतं पांचवं तोंडच कसं बाई यांच्या धडाला चिकटलं?

**प्रो० टोंबेः**—देवाच्या हातून गर्दीत लागलं गेलं झालं? चीफ ऑफिसर तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे. पण काय हो, त्या म्युझियमूमधलीं चित्रं, कवड्या, बाहुल्या वगैरे जिन्नस?

**चीफ ऑफिसरः**—अहो त्याची नाहीं का तुम्हांला गंमत ठाऊक? तुम्हांला आहेना, कपिलाबाई ठाऊक? अहो, त्या वेळेला होते चैत्राचे दिवस! मारे मेंबर लोकांनीं आपल्या इथं हळदीकुंकवाची गौर मांडायला नेलीं चित्रं! आतां नुस्ता एक कारकून नी केरसुणी राहिली आहे त्या म्युझियम्‌मध्यें छे, छे! त्यावेळची ती खिरापत, बत्तासे, पन्हीं, रस आणि कैऱ्या किसून घातलेलीं डाळ आठवली म्हणजे अजून दांत आंबतात माझे! एकंदरींत काय, नुसता ताबुताचा दंगा आहे झालं!

**कपिलाः**—अहो, मन चंगा तो कथोटमे गंगा. मन निर्मळ पाहिजे. मन साफ पाहिजे! अहो, परवां त्या ढबुराव चौफुल्यानं नाहीं का आमच्या डॉक्टरना चिठ्या देऊन गांवच्या मैलगाड्या आपल्या शेतांत रिचवल्या. मैला असला म्हणून काय झालं? मन साफ पाहिजे, मन निर्मळ पाहिजे!

**गट्टुलालः**—हां हां, सत्य है! मन चंगा तो कथोटमे गंगा! अरे कुंडिबा, येतो खुल्लो खुल्लो शवदो है! अरे लाखकी करो चोरी और कवडी का करो दान इशीशे कलजूगमें प्रसन्न है भगवाण. इश हात देणा इश हात लेवणा.

**पांडोबाः**—जे दुसऱ्यांना लांच देतात, भीड घालतात ते स्वतः नागरिकांच्या पैशाच्या खतानं आपलं पोट पिकविणार नाहींत, असं कल्पांतीं घडणार नाहीं.

**कोंडिबाः**—बराबर हाय, मन शाप पाहिजे, मन शाप पाहिजे!

**चीफ ऑफिसरः**—पण त्याची जमीन काय सुपीक झाली बेट्याची! खिळे पडले त्याच्या पहारी झाल्या, कुदळ पडली त्याचे नांगर झाले, आणि

भुयमूग लावला होता त्याची रताळी काढलीन्! आणि हें पहा हें कुठेंही चालायचंच! असा हा म्हारवाडा गांवोगांवीं असायचाच.

[ कोकिला व नथू चहा आणतात.

**प्रो० ठोंबे:**—अलो, गुडमार्निंग कोकिलाबाई, का डॉक्टर ठीक चाललं आहे ना? [ सर्व चहा पितात.

**पांडोबा:**—उत्तम प्रकारें दोन पायांवर चाललं आहे. कनक आणि कांतेच्या कसोटीवर एक वेळ मनुष्य लावा म्हणजे ताबडतोब कळून येतं कीं हें सोनं बावनकशी आहे कीं अकरमाशी आहे! अरे वारे वा! आज नगर-देवतेच्या अकलेच्या गुलछबूचे कांदे खांचित जमा झालें आहेत. या म्हसोबांना पाहून हें बालसंगोपन आणि हें प्राथमिक शिक्षण अगदीं लचकून मुरडून अर्धाजीव करीत आहेत! कसलं काय नि कसलं काय, झालें!

पद

**भरला स्वार्थाचा बाजार सगळा । गहिंवर मग प्रेमाचा कुठला ॥ जइं तटिनीं मीनावरि टपतसे बगळा ॥ जरि दिसला सकला मुनि समाधित रमला ॥ १ ॥ भासति वरुनि जरी केसरी । रासभ जातिवंत अंतरीं । किती वरवरुनी गाळिती हे नक्राश्रूला । विफल होय या पुढतीं गीता-वचनाला ॥ २ ॥**

**कोकिला:**—वेल, डॉक्टर? वुइ मस्ट गो नाऊ! बाहेर अगदीं ऊन पडलें! आपल्याला आधी डिस्पेन्सरींत गेलें पाहिजे ना? आज इन्स्पेक्शन आहे ना?

**डॉक्टर:**—जाऊं हो सावकाश! बोलून चालून धर्मार्थ तर दवाखाना, त्यांतून म्युन्सिपालिटीचा.

**कोकिला:**—तें खरं! पण प्रायव्हेट प्राक्टिस करतो ना आपण? बाकी सरकारी दवाखान्यांत तरी सिव्हिल सर्जन काय उजेड पाडतात म्हणा!

**डॉक्टर:**—आम्ही म्युन्सिपालिटीचेच फार बरे, निदान सणावारीं तरी येतों एखादे वेळेस लोकांच्या वाड्यांला!

**चीफ ऑफिसरः**—बरं आहे! येतों कपिलाबाई.

**कपिलाः**—बरं आहे! असाच कृपालोभ असूं द्या पायधुळीचा!

**पांडोबाः**—एवढी कशाला विनवणी पाहिजे! ते आहेतच तुमच्या पायधुळींत नेहमीं पडलेले.

**चीफ ऑफिसरः**—उगीच आमचा बहुमान करतां झालं? तुम्ही म्हणजे प्रत्यक्ष आमची मॅनेजिंग कमिटी आहांत.

**कोंडिबाः**—मला तर तुम्ही अक्षी जनरल बाडीसारख्या आहांत?

**गट्टुलालः**—अरे कुंडिबा, सबजन लबाडी है, सबजन लबाडी है! अरे कांई बोल्या! ये कपिलालुगाइको डाकुरजी ऐसा सौंदर्यरत्न अर्पण कीयो है के इषि तेजसे मारो डोळो तो घणी झगमग झगमग कऱ्यो है! अरे ये तो एषा जाणो की जीषा कमेटीका लबाडी है!

**कोंडिबाः**—कांहीं जरी झालं तरी शेवटीं आमची सर्व मदार तुमच्यावरच ऱ्हानार! [ आंत बंबाचें शिंग वाजतें.

**डॉक्टरः**—ओ हो हो! कुठेंतरी आग लागली वाटतं! सेक्रेटरी चला चला अगोदर तिकडे गेलंच पाहिजे आपल्याला!

**गट्टुलालः**—आरे भाई कहां आग पडियो है? म्हारे कपडेके दुकानमे तो नही है? कपाषके जीन प्रेसमां हुयो तो ठीक है उष्को तो मैंणे तिगणा इन्शुअर किया है. पण कपडेके दुकानमें तो नही है? अरे भाई सेक्रेटरी थारो आगणो बंबो तो ठीक है, अरे कुंडीबा, देखो तो आगणो बंबो शिंग फुंक फुंक कठी जावे छे? चलो भाई दवडो.

**चीफ ऑफिसरः**—झालं? थोडसं घरी जाऊन अंग टाकीन म्हटलं तर पेटवलंन् कुणीतरी आपलं घर! आपलं नाक कापून दुसऱ्याला अपशकुन करायची संवयच या गांवच्या लोकांना. पावसाळ्यांत पेटवलं असतन् तर?

**कोंडिबाः**—आतां काय, त्याचं कांहीं बी असना. योक वेळ तथं जाऊन येणं पडलं खरं. चला गट्टुलाल, बरं आहे, रामराम.

[ ठोंबेखेरीज सर्व जातात.

**प्रो० ठोंबेः**—ठीक आहे! कपिलाबाई, आम्हीही घेतों रजा तुमची.

**कपिलाः**—कुठें आग लागली? कुठें आग लागली?

**प्रो० ठोंबे**.—जाऊंद्या हो! घरोघर आग लागलेलीच आहे! हो बरी आठवण झाली! आमचं तेवढं त्या धेनुवल्लभाकडं जुळवलं पाहिजे बरं का? हो! घेऊंया वाहत्या गंगेंत हात धुऊन!

**कपिला**ः—त्याची तुम्हांला नको काळजी. आपण आणि मी दोन का आहोंत? काल त्या वेखंडशास्त्र्याची नाहींका वर्णी लावून दिली? तसंच तुम्हांलाही चिकटवून देतें झालें! बरं, पण आपण तेवढं स्कूलबोर्डाकडून, माझ्या पगारवाढीचा आणि घरभाड्याचा प्रश्न युक्तिनं सोडवायचा बरंका!

**प्रो० ठोंबे**ः—त्याची नको हो तुम्हांला काळजी. तुमचं काम जसं कांहीं माझंच घरभाडं वाढतं आहे असं करतो नेटानं. [ जातो.

**कपिला**ः—पांडोबा, जग हें असें आहे.

**पद**

**ही नटवि सुंदरा वसुंधरा ॥ नरासि मोहवि सुरासुराही ॥ धृ० ॥ भव्य पसारा ॥ भासविणारा अनादि स्वार्थचि परंपरा ॥ १ ॥ बलहीनावरि ॥ बली जीवन करी ॥ एकचि नियमन चराचरा ॥ २ ॥**

**पांडोबा**ः—आणि प्रत्येकाला आपण कुणीतरी दुसऱ्यापेक्षां शिष्ट आहोंत असं वाटतं ही त्यांत मौज आहे.

**कपिला**ः—एवढा नको कांहीं टोमणा मारायला! या जगांत शिष्टपणाच्या भावनेची मौज आहे, म्हणून तर जगण्यांत अर्थ आहे. हें पहा, आतां तुम्हांला थोडक्यांत सांगतें पुढील बेत, नीट ऐका. तुम्हांला त्या धेनुवल्लभाचा प्रायव्हेट सेक्रेटरी करून, त्यानं हाय्यर सोसायटींचा जंटलमन होण्याकरितां धरलेल्या महत्त्वाकांक्षेची परिपूर्णता मी तुमच्याकरवीं घडवून आणणार आहे, समजलांत! चला आंत, मी सगळं तुम्हांला समजावून सांगतें. [ जाते.

**पांडोबा**ः—हो चला! म्हणजे माझंही थोडसं एकाग्र चित्त होईल. आज-पर्यंत दुरून साजऱ्या गोजऱ्या हिरव्यागार दिसणाऱ्या ह्या मुनसिपालिटीच्या

डोंगरावर या कपिलेच्या मदतीनं येऊन पडल्याबरोबर येथील खांचखड्डे, दऱ्या, खोरीं, खडक आणि कडे माझ्या डोळ्यासमोर धडधडीत उभे राहिले. इतकंच नव्हे तर येथील श्वापदंही थोडीथोडीं दिसलीं. जिनें मला इथं आणलं, त्याच कपिलेचा मलाही एक दिवस ह्या डोंगरावरून एखाद्या दरींत ढकलण्याचा किंवा एखाद्या अकलेच्या तुटलेल्या कड्यावरून कडेलोट करायचा विचार दिसतो आहे, पाहूंया सावधगिरीनं वारा येईल तशी पाठ देऊन, ह्या लोकमतानुवर्ती संस्थेच्या जंगलांत चार उपदेशाच्या गोष्टी, ह्या श्वापदांना त्यांच्या कल्याणाच्या सांगून वळवणं म्हणजे मुसळाला पाणि घालून पालवी, फुलं आणि फळं येण्याची वाट पहात बसण्यासारखंच आहे ! चला काय काय होतं तें पहावं ! [ जातो.

---

## प्रवेश चवथा

[ **स्थळः**—रस्ता. पात्रेंः–**गंगू , शेख, धोंडोपंत कंपाऊन्डर व रंगराव.**]

**गंगूः**—अजून तरी तुझं कुडकुड हुक्कापाणी सोड कीं ! समद्या गांवाला आग लावशील कीं !

**शेखः**—हां ! यार सच कहती है तूं !

**गंगूः**—अरे अरे अरे ! ! ! कालरात्रीं बघा धोंडोपंत कंपाऊन्डर ! केवढी आग लागली ! केवढी आग लागली ! ! सगळ्या जन्मांत कधीं पाहीली नाहीं ! त्या गरीब कुंभाराचं नवं कोरं बांधलेलं घर आणि बायको, आणि लहान दोन पोरं दगावलीं ! अरे अरे अरे !

**धोंडो०ः**—अर्र् ! केव्हां ? काल रात्रीं ? अर्र्र् आणि कशी ग लागली ?

**गंगू**—तें कांहीं विचारूं नका ! चौफेर घर पेटलं बघा ! आंतून पोरंबाळं आणि बायकोनं कल्होळ केला बघा ! सगळा गांव जमा झाला होता, पण कोण घुसणार बाबा त्यांमंदी ! अर ! अर ! देवा नकोरे बाबा आमच्या दुस्मानाला दीखील असा प्रसंग आणूस ! हे पहा रंगोबा आलं, तेच तुम्हांला सर्व हकीगत सांगतील. मला पाहून अगदी रडूं कोसळलं पहा ! [ रडते.

**धोंडोपंतः**—काय रंगोबा? तुम्ही आलांत का चवकशी करून? काय हो कशी लागली आग?

**रंगरावः**—काय सांगावा तो प्रसंग! अहो, त्याच्या घरासमोर रस्ता-रिपेरीचं रात्रपाळीचं काम सुरू होतं! वाफेचा रूळ खडी दाबीत होता! आणि त्या वाफेच्या रूळाच्या एंजिनमधून सारखा ठिणग्यांचा झोत उडत होता! त्यावर तारेच्या जाळीचं झांकण नव्हतं! एकंदरीत कपाळ फुटलं नी घर पेटलं!

**धोंडोपंतः**—अररर! काश हो, टेलिफोन नाहीं का झाला ताबडतोब?

**रंगरावः**—काय बोलतां तुम्ही धोंडोपंत? टेलिफोन नाहीं का झाला? अहो, टेलिफोन म्हणजे आकाशवाणी का होत असते? अहो, लोक धांवले इकडे तिकडे! दिला टेलिफोन! पण त्या नळकंड्यांत अडकलं होतं झुरळ! बॅटरींत पडला होता उंदीर! आणि खांबावरची चिनीची तार गुंडाळायची दौत गेली होती फुटून! म्हणून दिलेला टेलिफोन या मृत्युलोकावर न जातां पाताळांत शेषाला गेला!

**धोंडोपंतः**—काय म्हणतां? पण आग विझली कशी?

**रंगरावः**—कसली विझते! त्या घराभोंवतींचीं आणखी चार घरं लोकांनीं ओढून पाडलीं! मग कुणी माती फेंकतात! कुणी विटा, कुणी चुना वगैरे वगैरे कुणी कांहीं कुणी कांहीं! जेमतेम विझली झालं!

**धोंडोपंतः**—काय हो? पाण्याचं नांव नाहीं? पण आगीचा बंब नव्हता का?

**रंगरावः**—अहो, नव्हता कसा? हजर होता.

**पद**

**अहो! शिंग फुंकीत गेला, पाण्याचा इंग्रजी बंब॥**
**मुनसिपालटीचा गेला, पाण्याचा इंग्रजी बंब॥ धृ०॥**
**दोन घंट्यावरी धनि बोंबा मारी। घरिं उसळला आगीचा डोंब॥ आग सोमेश्वरीं बंब रामेश्वरीं लोक पाहोनी झाले दंग॥१॥ बंबवाले सगळे झिंगले झोकुन भांग, अहो बंबावर बितबित जंग॥ त्याचा नळ**

**फाटका वरि गाडा मोडका पडलं इंजीनचं चक्रचि बंद ॥ १ ॥ हौदा पाणी नसे नच विहिर कुठें फायर प्लगचा न लागला थांग ॥ बंब पोंचे तोंवर झाला कोळसा तिथं, घरधन्यासि होई अधोंग ॥ ३ ॥ अहो घंटा वाजवित आला रिकामा पाण्याचा बंब ॥**

चला आतां इतक्यांत म्युनिसिपल शंकर सर्व तिकडेच गेले आहेत आपणही जाऊं तिथं !

**धोंडोपंतः**—आतां अगदीं कसून तपासणी चालू द्या म्हणाव? चला तर. उचला पाऊल, तिथें आपल्याला गेलं पाहिजे, नाहीं तर हे मेंबर्स आमच्या पोटाला आग लावायचे ! हं !

**गंगूः**—ऐकलंसना समर्द? फेक तुझा हुक्का तो आतां ! माझ्या गरिबाच्या झोपडीची देशील होळी करून !

**शेखः**—अरे जानेदे तेरे झोंपडीकू ! जलगई तो बला गई ! देख कल गवनूरका कप है ! बोल तेरे नामसे कितने घोडे लगा देऊं? क्या हंसरही है? देख एक दिन् ये नशीबका चक्कर फीर जायगा !

**गंगूः**—फिरतया चक्कर तुझं कबरींत आतां ! [ जातात.

**पांडोबाः**—मनाची हौस होती ती फेडून घेतली. वर्तमानपत्र, सभा, आणि गांवांतली ओरड यांवर विश्वास बसेना म्हणून नाजूक शिफारशीन अगदीं मुनसिपालटीच्या काळजांत शिरलों, आतां खरं ईंगित कळलं. मेंबरांच्या मुनसिपल कामगारांच्या आणि यांच्या बगलबच्चांच्या कोणाच्या कोठ आंवळे शिजतात, कोणाच्या कां पोटांत ढवळतं, कोणाची कां एवढी तळमळ चाललेली असते याचा लख्ख प्रकाश पडला. मला अत्यंत दुःखानं प्रांजलपणानं कबूल करावं लागतं कीं, ही मुनसिपालिटीची झोटिंग पातशाही म्हणजे अत्यंत नीचपणाच्या कमालीची मानपानबाजी चैनबाजी, नफेबाजी आणि सट्टेबाजी आहे. लोककल्याणाच्या पांघरुणाखालीं जनरल बॉडी मॅनेजिंग कमिटीवर गुरगुरते. मॅनेजिंग कमिटी अधिकाऱ्यांवर डोळे काढते. अधिकारी शिपाईप्याद्याला दमदाटी करतात आणि शिपाईप्यादे गोरगरिबांच्या माना मुरगळतात. एकंदरींत सुखसोईसाठीं आणि संरक्षणासाठीं दिलेला जनतेच्या

कराचा पैसा चांगला घशाखालीं उतरून पचन होऊन साफ होतो. चला, तो धेनुवल्लभ वाट पहात बसला असेल, तरी आपण आपल्या नवीन कामगिरीवर जाऊन रुजू झालं पाहिजे.

---

## प्रवेश पांचवा.

[ स्थळः—धेनुवल्लभांचा दिवाणखाना ]

**धेनुवल्लभः**—जिथे पैसा आहे तिथें सर्व कांहीं आहे! या लढाईनं तर मजा उडवून दिली! काय साला थाट आहे! आतां या जन्मांतच करून दाखवितों विद्या! विद्या विद्या म्हणजे काय बिशाद आहे! आमच्या प्रोफेसर-साहेबांनीं काय पहा शब्द सांगितला तो! हो! करतलमलवत् तळहातांतल्या आंवळ्यासारखी विद्या हस्तगत करून टाकतों. माझ्या संपत्तीकडे बघून जशी संस्थानिकांनीं लाळ घोटावी, तशीच माझ्या विद्वत्तेकडे पाहून पंडितांनीं तोडांत बोटें घालावी अशी पुढचे पावसाळ्याचे आंत विद्या संपादन करतों. आत्तांपर्यंत बऱ्याच डाकबंगल्यांना मदत दिली, धर्मशाळांना मदत केली, दुष्काळ-फंडाला मदत केली, हॉस्पिटलला फंड दिला तरी अजून सरकारांतून आम्हांला एखादं पदवीदान सुटत नाहीं! काय करावं हो! जरा एखादी पदवीबिदवी असली म्हणजे थोडा दबदबा राहतो! काय करावं! शेंकडों बंगल्यांवर खेटे घालून पायाचे टाके ढिले झाले! कांहीं वेळ तर बंगल्यावरच्या बदमाष शिपुरड्यानं मला गचांड्यासुद्धां दिल्या! काय सांगूं, मला अजून आठवतो आहे तो प्रसंग! मला सकाळीं बंगल्यावर एकानं बोलावलंन आणखी अमुक एक इस्पितळाला मदत केलीत तर तुम्हांला पदवी मिळण्याचा संभव आहे, असं तो म्हणाला मात्र, ताबडतोब दहा हजारांचा चेक फाडून दिला! दुसऱ्या दिवशीं उन्हातान्हांतून धांवत बंगल्यावर गेलों. ऊन्हांत तळमळत दोन तास उभा होतों! शेवटीं एक शिपुरडा दिसला, त्याला माझी व्हिजिटिंग कार्ड दिली. तशी थोड्या वेळानं साहेब आंतून डॅम फूल, ब्लॉकहेड असें मोठ्यानदा म्हणत आला! तशी मला कांहीं इंग्रजी बिलकूल येत नाहीं, मला वाटलं, मी एक पदवी मागायला गेलों, तों सरकारांतून मला तीन पदव्या

मिळाल्या वाटतं! पण शेवटीं त्याचा उलगडा झाला. तो जों आला नाकासमोर तों एकदम गळचेंडी धरून बुटाचा पाय असा खुबीनं माझ्या पाठीशीं लावला कीं, जसा गलोलींतून धोंडा फेंकावा तसा तडक बंगल्यांतून सडकेवर उड्डाण करून येऊन पडलों! अगदी सिनेमाच्या सारखं झालें! शेवटीं शिपायानं बाहेर येऊन सांगितलं कीं, बंगल्यांत मेमसाहेब साहेबाला शिव्या देत होती, तेव्हां तें मला दिसलं कीं काय असं वाटून साहेबानं मला रागानं निरोप दिला, याबद्दल साहेब बेग पार्डिग करून दिलगिरी दाखवितो आहे! तेव्हां माझा जीव खालीं पडला. आणि वाटलं कीं हरकत नाहीं; साहेब मनमोकळा असतो तें खरं आहे! त्याच्यांत माणुसकी होती. असो. आत्तांच त्याचं पत्रही आलं आहे कीं यंदां वर्षारंभी कदाचित् तुम्हांला पदवी मिळेल! पाहूं या नशिबाचा योग जुळला तर! सध्यांच आमचं येत्या मुनसिपालटींत जाण्याचं कसं काय शिजत आहे तें पहावं. आमच्या कपिलाबाईकडून मी लावली आहे चांगली आंच! जर का हें शिजलं आणि तिकडून जर का एखादं पदवीदान सुटलं तर दुधांत साखर होईल. माझ्याकडून मी अगदीं रेसभर प्रयत्नांत कसूर ठेवीत नाहीं. कौन्सिलरला शोभेलशी रहाणी, थाटमाट, पोषाख वगैरेंत चूक काढण्याची चांगल्या चांगल्या मुरलेल्या कौन्सिलरांची सुद्धां छाती नाहीं! बरं, विद्येच्या आणि ज्ञानाच्या बाबतींत म्हणाल तर तिकडेही सारखी धुमश्चक्री चालू ठेवली आहे. अरे पांडुरंग, अरे पांडू, काय रे ती आंब्याची डाली प्रेसिडेंट रावसाहेबांच्याकडे पाठवलीस का?

**पांडोबा**:—होय, रावसाहेब.

**धेनुवल्लभ**:—( अत्यंत आनंदानें ) काय म्हणालास तूं!

**पांडोबा**:—डाली पाठवली महाराज, आत्तांच् रावसाहेब देऊन आलों.

**धेनुवल्लभ**:—काय म्हणतोस? महाराज! रावसाहेब!

**पांडोबा**:—होय सरकार.

**धेनुवल्लभ**:—काय सरकार! ( त्यास कडकडून भेटतो. ) अरे स्वर्गांतल्या देवगंधर्वा, कोणच्या क्षुल्लक पातकामुळें पुन्हा या मृत्युलोकीं अवतरलास तूं? महाराज! रावसाहेब! सरकार! बस् बस् बस्. मेरे पितर सरगभये! आण

आग तो आरसा इकडे आनंदाच्यामुळें चेहरा लालबुंद होत चालला आहे ? नजर ठरत नाहीं आरशांत चेहऱ्यावर. पांड्या! तुला आपलं थोडं खासगी विचारतों. कायरे या गांवांत जे कौन्सिलर्स आहेत त्यांच्यापेक्षां मी अधिक रुबाबदार, उमदा आणि खानदानीचा दिसतो काय रे ?

**पांडोबाः**—सरकार! हें काय विचारावं आणि या चाकरानं काय सांगावं! ह्या सरदारापुढं ही कौन्सिलरं, म्हणजे नुसतीं मुनसिपालिटीच्या पांजरपोळांत शिरलेली पाठीला खोगर लागलेलीं मरतुकडीं तट्टं आहेत, बघा! ह्या माझ्या सरकारची, ह्या सरदाराची, ह्या जातिवंत खानदानीच्या अरबी घोड्याची ह्या तट्टांना सर येणार म्हणता होय ? नांव कशाला पाहिजे! सात वेळ जातकुळी बदलली पाहिजे! त्या वेळेस ही तट्टं, ह्या माझ्या अरबी घोड्याचे नातू म्हणून घेतली!

**धेनुवल्लभः**—पांड्या! पांड्या! अरे पुराणपुरुषा! गजब करतोस तूं तर! घे हें माझं जरीचं उपरणं!

**पांडोबाः**—नको सध्यां सरकार! शेवटीं मी तुमचाच आहे! अरे! हे प्रोफेसर ठोंबे आलेच.

**धेनुवल्लभः**—काय म्हणतोस? या! या! बसा! आपल्याविषयीं सर्व कपिलाबाईनं मला पूर्वींच कळविलं आहे. बसा! तुम्हीं आपली अगदीं आईटमेंट् राखलीत बोवा. या बसा!

**प्रो० ठोंबेः**—काय? आईटमेंट्! हं! हं! हं! अपाईंट्मेंट् वाटतें! कसं काय? आपली तब्येत वगैरे बरी आहे ना? ठीक आहे! आपली काय इच्छा आहे शिकण्याची? कोणचा विषय? तयारी आहे माझी.

**धेनुवल्लभः**—सगळं कांहीं शिकण्याची आहे. हें पहा थोडक्यांत सांगायचं म्हणजे प्रोफेसर ठोंबे, मला सगळया जगानं विद्वान् म्हणून मान वांकवली पाहिजे. अशी कांहीं तुमच्यांत करामत असेल तर करा! काय करावं हें सगळं लहानपणींच शिकायला पाहिजे होतं.

**प्रो० ठोंबेः**—कांहीं हरकत नाहीं. तुमच्यांत उल्हास, हौस आहे हें कांहीं थोडं नाहीं. अजून कांहीं वेळ गेली नाहीं. ( It is never too

late to mend ) समजलांत कीं नाहीं. आपल्याला थोडंसं इंग्रजी येतं कीं नाहीं ?

**धेनुवल्लभः**—होय, पण मला बिलकूल यत नाहीं. अस समजूनच चला.

**प्रो० ठोंबेः**—ह्याचा अर्थ सत्कार्याला केव्हांही प्रारंभ करावा.

**धेनुवल्लभः**—इंग्रजी अगदीं बरोबर आह.

**प्रो० ठोंबेः**—ठीक. तर मग प्रथम कोणतं शिकवूं बोला ? तर्कापासून सुरवात करूं ?

**धेनुवल्लभः**—पांड्या ! हें तर्क काय आहे ?

**प्रो० ठोंबेः**—अहो, ह्या तर्काची बरीच भानगड आहे. मनाच्या तीन अवस्था प्रथमावस्था, द्वितीयावस्था, तृतीया--

**धेनुवल्लभः**—काय ज्ञान आहे ! काय ज्ञान आहे. ! अगाध, अगम्य आहे ! हें फार भानगडीचं आहे बाबा !

**प्रो० ठोंबेः**—ठीक आहे ! मॉरल फिलासफी शिकवूं ?

**धेनुवल्लभः**—पांड्या ! हें काय नवीन लचांड ?

**प्रो० ठोंबेः**—यामुळं आत्मसंयमन कसं करावं, मनोविकारांचे दमन कसं करावं, वगैरे, वगैरे, पापपुण्य—

**धेनुवल्लभः**—पाप ! पुण्य ! वगैरे, वगैरे, सगळें सत्ययुगांत जाऊं द्या ! मला तर मनोविकार मुळींच दाबतां यायचे नाहींत ! पांड्या ! सगळा जन्म गेला मजा करण्यांत, आतां कसलं दमन शिकवितो आहे हा प्रोफेसर !

**प्रो० ठोंबेः**—ठीक आहे. तुम्ही फिजिक्स शिका ! त्याच्यामुळं पदार्थांचे गुणधर्म, पंचतत्त्वें, धातु वगैरे वगैरे जगांतील सर्व विद्यमान गोष्टींविषयीं. जसें:-ढग, पाऊस, वीज, वादळ, बर्फ, गार वारा वगैरे.

**धेनुवल्लभः**—पांड्या ! काय ज्ञान आहे ! काय ज्ञान आहे ! नुस्तीं नांव सुद्धां जन्मांत पाठ व्हावयाची नाहींत. ह्या सर्व गौडबंगलांत शिरणं म्हणजे सर्व विद्यमान जग डोक्यावर घेण्यासारखं आहे ! हें पहा ! तुम्हांला स्पष्ट सांगतों. मला मुनसिपालिटीचा प्रेसिडेंट व्हायचं आहे. तेव्हां तिच्याविषयीं मला माहिती सांगा !

**पांडोबाः**—बस्, बस्. एक घाव दोन तुकडे ! याला म्हणावं मानपानबाजी !

**प्रो० ठोंबेः**—वा ! वा ! तुम्हीं मला अब्रू बचावून काढलात ! ठीक

आहे! हें काय सांगावं, आपण या वेळेस अलौकिक तारतम्य दाखविलंत! खरोखर मी तुमची स्तुति करीत नाहीं. आपण उपजत विद्वान् आहांत.

**धेनुवल्लभ**—शाबास प्रोफेसरसाहेब, तुम्ही खरोखर मनुष्याची पारख करणारे आहांत!

**प्रो० ठोंबे**:—ठीक आहे. आपण म्युनिसिपल कॉन्स्टिटयूशनच प्रथम घेऊं.

**धेनुवल्लभ**:—होय, मुनसिपल कानसटीपेशनच प्रथम घ्या.

**पांडोबा**:—झालं आहे खरंच मुनसिपालिटीला कॉन्स्टिपेशन, पहावं आतां धेनुवल्लभाचा जमालगोटा कसं काय काम करतो तें.

**प्रो० ठोंबे**:—ठीक. आपण प्रथम म्हणजे एम्. एम्. सी. नंतर एम्. एल्. सी.!

**धेनुवल्लभ**:—होय, होय! एम्. एम्. शी. काय आहे रे पांडुरंग?

**पांडोबा**:—अहो लहान मुलं 'शी' नाहीं का म्हणत? अहो जवळ जवळ तसंच. मुनसिपालिटीचे लोक जी 'शी' करतात ती एम्. एम्. शी. आणि गवर्नरचे कौन्सिलर्स जी कौन्सिलांत 'शी' करतात म्हणजे घाण करतात, ती एम्. एल्. शी. घाण दोहींला सारखीच येते.

**प्रो० ठोंबे**:—मेंबर ऑफ धी लेजिस्लेटिव्ह कौन्सिल! आहे! आहे! तुमच्या नशिबांत तो योग दिसतो आहे!

**धेनुवल्लभ**:—आपण फार मार्मिक आहांत बुवा! पांडू! उगीच विध्वान आहेत?

**प्रो० ठोंबे**:—हें पहा, १९०१ च्या तिसऱ्या ॲक्टाप्रमाणें म्युनिसिपालिटी स्थापन केली. नागरिकांनीं आपल्या गांवची व्यवस्था करण्याकरितां चारपंचमांश कौन्सिलर्स निवडावयाचे. समजा, अठ्ठावीस मेंबर निवडून काढावयाचे, त्याचे चारपंचमांश म्हणजे साडेबावीस लोकांनीं निवडावयाचे व साडेपांच सरकारनीं निवडावयाचे.

**धेनुवल्लभ**:–हा तर मोठा पेंच आहे इथें! अर्धा कसा निवडावयाचा?

**पांडोबा**:—त्यांत काय आहे? बावीस संबंध खुळचट त्यांत एक अर्धवट, झाले साडेबावीस!

**प्रो० ठोंबे**—हां ! बरोबर शंका आहे तुमची ! आहे खराच पेंच ! याचा कांहीं उलगडा म्युनिसिपल ॲक्टांत नाहीं. हें मी उद्यां आमच्या कोपऱ्या क्लबचे दादासाहेब रडतोंडे वकील, यांना विचारून सांगेन ! कारण हा कायद्याचा भाग पडला ! असो. त्यांनीं पुढें आपल्यांत प्रेसिडेंट, व्हाइस प्रेसिडेंट, वगैरे वगैरे निवडायचे. पुढें त्यांत स्कूलबोर्ड कमिटीज्, मॅनेजिंग कमिटीज् नेमायच्या. त्यांचे चेअरमन निवडायचे.

**धेनुवल्लभः**—अबब्ब् ! या ज्ञानांत शिरणें म्हणजे अगदीं भूमध्य समुद्रांत बुडी मारण्याप्रमाणें आहे ! छे ! छे ! ह्या इंग्रजांची राज्यपद्धति म्हणजे भारी गिचमिडीची ! कोण भयंकर उलट्यासुलट्या कोलांट्या ह्या ! कायदा शिकण्यांत जन्म जायचा, त्याप्रमाणें वागायला पुढें फुरसत रहात नाहीं.

**प्रो० ठोंबेः**—अहो, एवढ्यांतच काय झालं आहे ! अंमलबजावणी खातीं, जकात खातीं, अबकारी खातीं, कितीतरी त्यांत अनंत खातीं आहेत.

**धेनुवल्लभः**—हें पहा प्रोफेसर, हा एवढा जंजाळ नको बुवा ! कोण ? वराहशास्त्री, या ! आमचें आतां आटपत आलें आहे ! थोडीं दहा मिनिटें ! हें पहा आपण सांगितल्याप्रमाणें नवीन कोरा जंगी मृदंग आणून ठेवला आहे. बसा. अहो ठोंबे ! हे तालनिष्णात आहेत ! बसा शास्त्रीबुवा. आपणही ऐका ! हं तर प्रोफेसर ! हे सगळे मुनसिपालिटीच्या आक्टाचे जंजाल उलगडणें म्हणजे पुन्हा वेरूळचीं लेणीं कोरण्यासारखेंच आहे ! मला येवढें ब्रह्मघोळांत न घालतां थोडक्यांत त्याचे दृश्य फायदे सांगा ! म्हणजे उलगडा झाला !

**वराहशास्त्रीः**—काय हो ? ही आपली मुनसिपालिटी तालबद्ध आहे का ? का बेताल आहे ? माझं तर असें मत आहे कीं, मुनसिपल पोसिडिंग्ज् चालू असतांना प्रेसिडेंटच्या मागें एक पखवाजी ठेवावा म्हणजे मेंबर बेताल होणार नाहींत ! मी हा ठराव पुढें मांडला होता पण कांहीं मेंबरांनीं तो हाणून पाडला.

**प्रो० ठोंबेः**—हा तर मोठा उंटावरचाच दिसतो, आपलं इंप्रेशन करायला बघतो आहे !

**वराहशास्त्रीः**—मी उंटावरचा नसून पादचारी आहें ! माझे ताल,

वैद्यक, तशीच होमोपाथी, वगैरे हरहुन्नर पाहून येथील महाजनसभेनें मला 'सिह' ही पदवी दिली आहे, मी आपल्या सारखाच पदवीधर आहे.

**पांडोबाः**—अहो, सिंहाच्या मागें ग्राम असेल!

**वराहशास्त्रीः**—मीही आपल्यासारखाच पंडित आहें.

**पांडोबाः**—अहो, पंडिताच्या मागें अरण्य असेल!

**धेनुवल्लभः**—आपण थोडें थांबा. बोला मला दृश्य फायदे कोणते ते?

**प्रो० ठोंबेः**—ऑलराइट! ऐका! कमिटीज्, प्रोसिडिंग्ज्, लॉज्, बायलॉज्, वगैरे अनंत अडचणीचे, आडवळणाचे मार्ग सोडून दृश्य फायदे किंवा धोपट मार्ग ऐका! आपल्या दारासमोर कंदील लावतां येतो.

**धेनुवल्लभः**—हिअर, हिअर.

**प्रो० ठोंबेः**—रस्तारुंदीची लाईन फिरून टाकतां येते.

**पांडोबाः**—हिअर? हिअर!

**प्रो० ठोंबेः**—आपलें गटार रोज उपसून घेतां येतें.

**धेनुवल्लभः**—हिअर देअर, देअर हिअर.

**प्रो० ठोंबेः**—गव्हर्नरच्या लेव्हीला बोलावणें येतें, सर्व नागरिकांचे मुजरे घेतां येतात.

**धेनुवल्लभः**—काय म्हणतां? मॉय गॉड? काय ज्ञान आहे! काय ज्ञान आहे! काय इंग्रजी राज्य आहे!

**वराहशास्त्रीः**—अरे! हा तर इंप्रेशन पाडायला लागला? माझ्यापुढें छाप पाडायला लागला! थापेसरशी उडवून देईन.

**प्रो० ठोंबेः**—चौकांतील घर नादुरुस्त आहे तें पाडलं पाहिजे. तें घर घेण्याचा मालकास धाक घालून रावसाहेबांचा दरारा कायम राखतां येतो. ह्याशिवाय सिनेमाला, नाटकाला फुकट जाणं, दूधकी लोटी, मलई नमुन्यावारी चाखणं, म्युनिसिपालिटीचा कडबा घरच्या म्हशींना घालून दूधदुभतं करणें, मेव्हण्याचें उकिरडाखिडार स्टोअर ठेवण्याकरितां दोनशें रुपये भाड्यानें घेणें, किंवा मार्केटच्या गाळ्याच्या परवानगीच्या धाकानें भाजीपाला, फळफळावळी चरणं, पानाला हात लावूं नये अशी म्युनिसिपल गार्डनला पाटी लावून पब्लिक गार्डनमधील मोगऱ्यांच्या कळ्यांच्या वेणीचा आपल्या पात्राकडे रतीब लावणें, असे अनंत पोटभेद आहेत.

**धेनुवल्लभः**—तादृश्य फायद्यांचे तर डोंगरचे डोंगर आहेत. पण कायहो त्या गरीब लोकांना कांहीं पैसा मोबदला द्यावा लागत नाहीं? मजा आहे. परमेश्वरा! पुढें सात जन्म जरी उंसाच्या फडांत जन्मालां घातलेंस तरी ह्या जन्मीं प्रेसिडेंट होण्याचं भाग्य माझ्या ललाटीं नसलं तर निदान मेंबर तरी कर, एवढी तुला हात जोडून या धेनुवल्लभाची काकुळतीची विनवणी आहे! काय ज्ञान आहे! काय अधिकार आहे! काय फायदा आहे! काय न्याय आहे! पैसा मोबदला द्यावा लागत नाही! पांड्या काय ज्ञान आहे! काय कायदा! काय फायदा! काय न्याय आहे!

**पांडोबाः**—सरकार, ह्या न्याय पूर्वापार चालत आलेला आहे.

**पद**

**जगिं धन्यां धत्तुरा गड्या मलीदा मिळतो । हा न्याय असाचि असतो ॥धृ०॥ प्रतिवादि उपाशी मरतो ॥ रोगीहि क्षयानें जातो ॥ वेश्यारत भणंग बनतो ॥ परि वैद्य, वकिल, वकलाचा हा वकार विजयी असतो ॥ १ ॥ मावळा शेत पिकवीतो । कुणितरी धरण बांधीतो ॥ जलसमाध सकलां देतो ॥ मळवुनी चोर गरिबांचें उलटी हकाटी करितो ॥२॥ अधिकारि बिगारी धरितो ॥ मोबदला लाथा देतो ॥ पानथरीस सूज चढवितो ॥ जो बळी तोचि गरिबांच्या धरोनि काना पिळतो ॥ ३ ॥**

**वराहशास्त्रीः**—पहा, सगळं पद तालांत म्हटल्याबरोबर कसं गोड लागलं तें! कोणच्याही कारभारांत ताल पाहिजे! राष्ट्राराष्ट्रांत ताल नाही म्हणून लढाया होऊन बेताल होतात. अगदीं प्रचारांतली म्हण! ताल सोडला!

**धेनुवल्लभः**—वाहवा, काय ज्ञान आहे! काय ताल आहे! काय ताल आहे!

**प्रो० ठोंबेः**—अरे, छाप पाडायला लागला. तुम्ही मूर्ख आहांत.

**वराहशास्त्रीः**—सरदार! हे शतमूर्ख आहेत! सरदार! माझं म्हणणं तर ऐका! तालांत काल आहे आणि कालांत ताल आहे. ताल त्रिकाल अबाधित आहे.

**धेनुवल्लभः**—प्रोफेसर ठोंबे, तुम्ही जरा थांबा! बोला, बोला कोणते ताल आहेत? त्यांची नांवें तर घ्या म्हणजे मला कोणचा प्रथम शिकावा तें कळेल.

**वराहशास्त्रीः**—ऐका महाराज! आदिताल, एकताल, चौताल, सुरफाक्ता, झंपा, धमार. हे सर्व ताल डफ, खंजिरी, चौघडा, मृदंग, ढोल, दुंदमी यांवर वाजवितां येतात! ही अशी विद्या आहे कीं, नुसता जर गजपर्ण बोल काढला तर मस्त हत्ती देखील ची ची करीत परत फिरतो!

**धेनुवल्लभः**—अहो! बोला! तुमचा धमार आणि सवारी मला अवश्य शिकला पाहिजे! माझी नैसर्गिक प्रवृत्ति नेहमी वीररसाकडे झुकते! मला शामळट, नेभळट, पुळचट मेंबर व्हायचं नसून चांगला बाणेदार, पीळदार प्रेसिडेंट व्हायचें आहे! काय हो! या धमार सवारीनं स्फुरण चढतं कीं नाहीं?

**वराहशास्त्रीः**—तें काय विचारावं सरकार! ही पहा सुरवातच करतो. मारला चीत हा प्रोफेसर!

**प्रो० ठोंबेः**—काय थापा मारतो! म्हणे ची ची करतो! अरे, हा तर इंप्रेशन पाडून गेला!

**वराहशास्त्रीः**—तुमच्या वडिलांनीं फक्त तुमचें नांव ठेवण्यांतच अक्कल दाखविली आहे. ऐका सरकार, धमार आणि सवारी! जर आंगरख्याचे बंद तटातट तुटले नाहींत तर नांव बदलून देईन—

**धेनुवल्लभः**—वाहवा! पांड्या, तरवार आण! अवसान आतां अगदीं झेपत नाहीं.

**प्रो० ठोंबेः**—अरे अरे! ह्या शास्त्र्यानें डाव जिंकला. अहो, हे गौणशास्त्र आहे.

**वराहशास्त्रीः**—तुम्ही सगळी कॉलेजांतील शास्त्रें ह्या मृदंगांत कोंबून ठेविलीं आहेत. ऐका आतां धमार!

**धेनुवल्लभः**—बोला धमार! (तरवार उपसून उभा रहातो.) पांडुरंगा संभाळ! मी अवसानांत चुकून वार करायचा! विरश्री बेफाम चढली आहे!

**पांडोबाः**—काळजी नको! बोला धमार.

**वराहशास्त्री**:—धि ध्धि ध्धि ध्धिरकिट, धिडनग कत्ता गदिगन, नाना तिट नगधी धडन्न गन्ना कत्ता गदिगन धुंधुं तिटि तिटि, त्रकिट किट, गदिगन धी.

**धेनुवल्लभ**:—( बोल ऐकत असतांना तरवार पाजळतो. मध्येंच बैठक व अवसान घेऊन वार करण्यास धांवतो, शास्त्री अरेरेरे म्हणत मृदंग पुढें करतों ) बोला ! या वेळेस मी मुनसिपालिटीचा प्रेसिडेंट कमांडर इन् चीफ शोभतो कीं नाहीं ?

**प्रो० ठोंबे**:—अहो शास्त्रीबोवा ! काढा पिडा, होय म्हणा !

**सर्व**:—सेनाखासखेल, मुनसिपल कमांडर इन् चीफ सरदार धेनुवल्लभकी जय !

अंक १ ला समाप्त

# अंक दुसरा



## प्रवेश पहिला

[ **स्थळः**–रस्ता. पात्रेंः–**अंबू व रंगराव.** ]

**अंबूः**—रंगराव! अक्शी चेहरा पडलाया तुमचा! चीफ ऑफिसरनं मारल्या व्हय कमरेंत लाथा काम चुकवलं म्हून?

**रंगराव**:—तसें नव्हे ग अंबे! अलिकडे तुला पाहिलें म्हणजे माझ्या पोटांत कसें भडभडून येतें. काय करायचे? आपल्यासारखं प्रेम सगळ्या मुनसिपालिटीत कोणाचं असेल तर शपथ. आपल्या सुइणीचं आणि डॉक्टराचं, कपिलेचं आणि धेनुवल्लभाचं, आपल्या चीफ आफिसरचं नी चंद्री दंतांडीचं, वराहशास्त्र्याचं नी ठकूमावशी सैपाकिणीचं, कोंडीबाचं आणि माळणीचं ह्यांचं प्रेम आपल्या पासंगालांसुद्धां लागणार नाहीं! पण काय करायचं? काय ग, तुझंही पण माझ्यावर प्रेम आहेना?

**अंबूः**—हें काय बरं असं विचारतां रंगराव? मी तर तुमच्या पायाच बटकूर आहें. ह्यो पघा रंगराव, मी जरी म्हारीन असल्यें, तरी तुम्हासंग मला महाराणीसारखं सुख होतंया पगा! तुमी दिसभर नंदर पडला नाहीं म्हंजी मला कसं रानांत चुकलेल्या हरनीवानी होतंया पगा!

**रंगरावः**—अग अग, अंबे, अंबे, तुझ्यापुढं कलमी अंबे देखील गोडीला फिक्के पडतील बघ; या आनंदामुळें उडी मारून आकाशांतल्या चंद्राला लोबकळून जावेंसें वाटतें बघ! किती गोड बोलनेस तरी तूं!

**पद**

**गोड बोला बोलून जीव नादिं लाविला॥**
**भोळ्या मनाला जादू माझ्या केला॥ धृ०॥**

**अंबूः—तुम्हाविण दुनिया ओस दिसे ही मनिं मुळिं मज**
**गोड वाटेना॥ मासळि पान्याविन तळमळ करी॥**

**रंगरावः—वेडापिसा हा रंगराव झाला॥ १॥**

छे, हें असं चोरटं प्रेम कांहीं कामाचं नाहीं ! ह्यांतून मार्ग शोधून काढलाच पाहिजे ! कारण सध्यांचं म्हणजे धर्मशाळेंत निद्रा, अन्नछत्री जेवण, असं चालू आहे. कांहीं तरी कायदेशीर इलाज पाहिजे. ( ती जवळ येते. ) अग असे नेहमी नेहमी चारचौघांन्या देखत माझ्या अंगाशी खेटून शिवाशीव करूं नकोस. किती झालें तरी तूं महारीण आणि मी पडलों क्षत्रिय ! काय करावें ? एकीकडे माझी जात आणि एकीकडे तुझें महारणीचं प्रेम ! मला मोठा पेच येऊन पडला आहे ! आमच्या जातीनें मोकळीक ठेविली नाहीं, धर्माची आज्ञा नाहीं, मुनसिपालिटीचा तसा कायदाही नाही !

**अंबूः**—पन रंगराव, काढाना कांही तरी तुमी विलाज ! कायद्याची लई अडचण पडलीया खरच ! पदोपदीं नडतोया कायदा !

**रंगरावः**—या जातीच्या, धर्माच्या मुनसिपालिटीच्या कायद्यामुळं माझी कशी चारचौघांत कुचंबणा होऊन राहिली आहे-गळचेपी झाली आहे पहा ! या दुष्ट, हरामखोर कायद्यामुळं चारचौघांच्या देखत आपल्या दोघांना असं केविलवाण्या तोंडानं एकमेकांकडे पाहून गुपचूप बसावं लागतं. ( एकमेकांकडे केविलवाणें पाहतात. ) ह्या दुष्ट कायद्यामुळें, काय करावें, असं खिन्न होऊन मान खालीं घालावी लागते. ( खिन्न होऊन माना खालीं घालतात. ) काय करावं, ह्या निर्दय कायद्यामुळें, असं सरतेशेवटी लांब लांब बसून, निराशेने, दुःखाचे सुस्कारे टाकून प्रेमाचे हुंदके देत रडावं लागतं. ( दोघं लांब बसून, श्वास सोडून हुंदके देतात. )

**अंबूः**—रंगराव ! जर का मुनसिपालिटीचा कायदा असता, तर बघा, चारचौघांच्या समोर असं हंसऱ्या तोंडानं येकमेकांला डोळ्यानं खुनावलं असतं ! ( त्याप्रमाणं खुणावतात व खिन्न होतात. ) पन काय करायचं, तसा कायदा-नाही ! जर का कायदा असता ( उठून उभे राहतात. ) तर चारचौघांत असं येकमेकांसंगं ख्येटून उभं राह्यलों असतों ! ( खेटून उभे राहतात. ) पन काय करायचं ! कायदा नाहीं ! ( लांब होतात. ) जर का कायदा असता, तर असा येकमेकांच्या खांद्यावर हात ठेवला असता ! ( तसें करितात. ) पन् काय करायचं ! कायदा नाहीं. ( लांब होतात. )

**रंगरावः**—जर का कायदा असता, तर चारचौघांच्या देखत एक-

मेकाला आलिंगून असा गळ्यांत गळा घालून तुझ्याशीं मोहतूर लावला असता! (खांद्यावर हात टाकून गळ्यांत गळा घालनात.) पन काय करायचं! अरे, अरे! काय कायदा आड येतो पहा आमच्या?

**अंबूः**—आतां ह्या कायद्याला काय विलाज करावा? लई भंडावलं कायद्यानं!

**रंगरावः**—हरकत नाहीं! सांपडला इलाज! आधीं माणूस कीं आधीं कायदा?

**अंबूः**—आधीं माणूस मंग कायदा!

**रंगरावः**—शाबास! कायदा कुणी केला?

**अंबूः**—माणसानं!

**रंगरावः**—आपणही माणसंच आहोंत! आहोंत ना? तर मग त्या कायद्याचं पुस्तक माजिस्ट्रेटाच्या आणि वकिलाच्या गळ्यांत बांधून हा माणूस निराळ्याच कायद्यानं देवासमोर शपथ वाहून तुझ्याशीं मोहतूर लावून टाकणार! कबूल तुला?

**अंबूः**—येवासमोर अक्शी कबूल म्होतूर! पन रंगराव—

**पद**

**म्होतुर झाल्यावरी मी सांगेन तसंच ऐकायचं ॥ धृ० ॥ तपासणिच्या वेळीं हकडतकड कुठं तिरव्या डोळ्यांनीं नाहीं तुम्हीं पहायचं ॥ वांकडी टोपी करून रात्रीं आठापुढें घराबाहेर नाहीं भटकायचं ॥ १ ॥ चिरिमिरी म्हणा, पगाराचे तसं सम्द रुपय माझ्या हातीं द्यायचं ॥ इष्कबाजी करून, चहाभजीं खाऊन दारू पिऊन नाहीं झिंगायचं ॥ २ ॥**

**रंगरावः**—पण तूं देखील अंबे—

**अदळ अपट करून, गाडगींमडकीं फोडून शिव्यागाळीनं नाहीं रागवायचं ॥ माझा डोळा चुकवून मोठ्या पहांटे उठून गल्लीबोळांत नाहीं धुंडाळायचं ॥**

**अंबूः—चिमणाचिमणीवाणी येकामेकांसंगं,**

**रंगराव**:—( एकमेकांच्या गळ्यांत हात घालून तिच्या हनुवटीस हात लावून ) **गोडीगुलाबीनं नांदायचं ॥ ५ ॥**

चल तर त्या देवासमोर ह्या कायद्याची खोड मोडून टाकूं. [ जातात.

---

## प्रवेश दुसरा

[ **स्थळ**:—म्युनिसिपल दवाखाना. पात्रें:—**धोंडोपंत, अंबू, डॉक्टर, कोकिला** व **रंगराव** ]

**धोंडोपंत**:-ह्या रोग्यांचीं औषधं खलतां खलतां मी आजारी पडावयाची वेळ आली आहे ! आमचा डॉक्टर बचनाग आणि कोकिला सुईण गांवाच्या मागें सारखीं हात धुवून लागलीं आहेत, तरी गांवची मृत्युसंख्या अजून कायमच आहे ! कारण आमचा हा धर्मार्थ दवाखाना, आणि गांवांतले दुसऱ्या डॉक्टरांचे दवाखाने म्हातारांकोतारा, तापकरी, दमेकरी, केसिसचा ताबडतोब निकाल लावून टाकतात ! कोणचीहि सिरीअस केस उलगडल्याशिवाय राहिली आहे असं मला तर आठवत नाहीं ! राम ! राम ! ! राम ! ! ! घंटाभर कुटतो आहे ! घाम सुटला मला; पण अजून याला ढिम्म नाहीं ! आतां तर बत्ता हालतां हालत नाहीं ! दोन्ही हातांनीं उपटला तरी निघत नाहीं. नारायण ! छे ! छे ! हें खलबत्त्याचें प्रकरण कांहीं ठीक दिसत नाहीं ! ठेवून देतों झालें ! दोन मजूर इकडे तिकडे ओढायला लागल्याशिवाय हें लचांड सुटणं शक्य दिसत नाहीं ! हें औषध खाणाराचं शेवटचा राम म्हणायला नुसतं नरडं उघडलं तर मला विचारा ! आपण आतां टेबलावरचीं स्टॉक मिक्श्चर्स करून ठेवावींत झालं ! अंबे, बरं झालं तूं आलीस ! पाणी आण तिकडून ! ( अंथरुणावरचा रोगी कण्हतो. ) लागलास का तूं घुमायला ?

**एक रोगी**:—अरे ! मला थोडं उठवून तिथलं जरा कुणीतरी थोडं भांडं द्यारे ! अग आई ! अग आई ! !

**अंबू**:—हतं येऊन मराया गोड वाटतंया येसनी ! अर ये बाबा ! दिसांतन घोटभरबी पानी पीत नाहींस आन् दिसांतन पन्नास वेळ भांडं मागतुयास तवा हायतरी कुठला तुझ्या पोटामंदी समुंदर !

**धोंडोपंतः**—कायरे बाबा अगस्ती! दवाखाना ठेवशील ना जाग्यावर?

**दुसरा रोगीः**—अरे मला अतिशय भूक लागली आहे रे! अजून मला घोटभर देखील दूध मिळालं नाहीं रे! कोणी दूध द्यारे!

**अंबूः**—धोंडोपंत! दूध मागतोया पगा!

**धोंडोपंतः**—होयना? मग पाज त्याला!

**अंबूः**—अतांशे दूध नाहीं येत लवकर दवाखान्यांत! हा नवीन पावना आलाया दवाखान्यांत. धोंडोपंत, तुम्हीच पाजा त्यासनी! अरे बाबा, असं समद्यांचं इवाळनं ऐकून आम्हांसनी उमाळा येऊं लागला तर त्येच पलंगांवर पडायची आमास्नीबी पाळी येयची! इकत्यांत काय धाड भरणार है तुमास्नी! थांब अगुदर पानी आनतेंया!

[ बकेट घेऊन पाणी आणण्यास जाते.

**धोंडोपंतः**—दूध मागतो आहे! ठेवलं आहे याच्या बापानं! बाकी मुनसिपालिटीच्या बजेटांत नसतं असं नाहीं मात्र! अहो, डॉक्टरच्या इथं रोज चार चार घंगाळं दूध, चहा, कॉफी नी कोको झडतो आहे! चिकन, ब्रॉथ, बिस्किट, आरारूट, फळफळावळ यांच्या तर ठिकया लागल्या आहेत! त्यानं आज उभ्या वर्षांत घरीं दिव्याला तेल आणलं असेल तर शपथ. नुसते दवाखान्यांतलं काडलिव्हर ऑईलच जाळतो आहे! [ अंबू येते. ] आलीस! बरं झालं! तूं जरा यांना पहा! मी तेवढीं स्टॉक मिक्श्चर्स करून ठेवतों!

**अंबूः**—धोंडोपंत, आज नळाच्या पान्याला लई घाण मारतीया बघा! तोंडांतबी घालवना! थोडं थोडं किडेबी दिसत्याती!

**धोंडोपंतः**—असूं दे, किडे नि घाण! औषधानं जाईल छपून त्याची घाण आणि किडे तर उलट चांगले! जास्त पौष्टिक पाणी! टॉनिक वॉटर!

**एक रोगीः**—अरे, आज औषध नाहीं रे मिळालं कांहीं, माझा सारखा डोळा खुपतो आहे! आग होती आहे भयंकर!

**धोंडोपंतः**—अंबे, ओत हें त्याच्या डोळयांत ! अजून लोकांचे डोळे उघडेनात ! उघडतो कीं मिटतो आहे देव जाणे !

[ अंबू औषध कानांत ओतते.

**एक रोगीः**—अग अग अग ! डोळयांत घालायचं तें कानांत काय टवळे ओतलंस ?

**धोंडोपंतः**—बरं ! बरं ! तोंड किती करतोस ? येईल कानांतून थंडोसा डोळयांना ! तें बोरीकलोशन आहे. दोन्हीकडे चालतं !

**अंबूः**—हिंग असं ! मीबी पाहतीया नव्ह का आज आठ वर्सं ! काय बाई ! टवळे म्हनतुया ! दम ! मिळेल आतां तूसनीबी भांडं !

**धोंडोपंतः**—आज आमची ही कोकिला-बचनागाची दुक्कल कोठें झुकली आहे कुणाला ठाऊक ! मुनसिपालिटी मातोश्रीनं आहेच तैनातीला मोटार दिलेली ! बसले असतील झालं–कुठंतरी लताकुंजांत मजा मारीत, नाहीं तर प्रायव्हेट व्हिजिटिंगमध्यें पैसे उकळीत ! सर्व जग आपसांत एकमेकांच्या मूर्खपणावर पोट भरतं आहे झालं ! पेशंट आणखी आले वाटतं ! काय हो, काय आहे ? ( ३–४–५ नंबरचे रोगी येतात. )

**तिसरा रोगीः**—काय हो, डॉक्टर नाहींत का इथं ?

**धोंडोपंतः**—ते काय रिकामटेकडे आहेत इथं बसून रहायला ?

**तिसरा रोगीः**—आम्हाला एक वेळ तपासून घ्यायचं आहे हो ! आम्ही फार वेळ खेटे घातले ! आज भेट करवाच आमची !

**धोंडोपंतः**—किती फाजील बोलतां हो ! इथं तपासून घ्यायचं असेल तर फी द्यावी लागेल ! काय ? आहे कबूल ?

**तिसरा रोगीः**—अहो, हा मुनसिपालिटीचा धर्मार्थ दवाखाना आहेना ? मग फी कसली मागतां ?

**धोंडोपंतः**—कायदेशीर जरी दवाखान्यांत घेतां येत नसली, तरी राजी-खुषीच्या कायद्यानं पेशंटांनीं डॉक्टरच्या खिशांत फी टाकलीच पाहिजे ! असेल कबूल तर उभे रहा नाहींतर चला उचला पाय !

**तिसरा रोगीः**—रोगपरीक्षेबद्दल मोठी ख्याति आहे यांची. जाऊं द्या फी पडली तर. बरें आहे ! कबूल ! देतों फी !

**धोंडोपंतः**—ठीक आहे! (या त्याच्या आजोबाचें कर्ज!) हें पहा, त्यांना भयंकर कामं असतात! सॅनिटेशन आहे, गांवसफाई आहे! सगळा गांव रोज पालथा घालावा लागतो त्यांना! आतां येतील कीं लागलींच पांच मिनिटांत जातील! उगीच त्यांचा वेळ नको मोडायला! काय फी आणली आहेत? ठीक आहे! धरा डाव्या हातांत! उजव्या हातानें दोन्ही पापण्या वर करून डोळे ताणून, जीभ लांब काढून असे रांगेनें उभे रहा! डॉक्टर आल्याबरोबर घडघडघड काय होतं तें सांगा! म्हणजे ते लागलींच रोग ओळखून औषध देतील! चला आटपा! पेशंटांच्या रोगांची काय डॉक्टरला स्वप्नं पडतात थोडींच? हे पहा आलेच. ही त्यांची मोटार!

[ डॉक्टर व कोकिला येतात.

**डॉक्टरः**—सकाळपासून शंभर व्हिज़ीटस् झाल्या! हा पहा खिसा फुगला आहे नोटांनीं! पोटीस बांधा, शेका, बर्फ ठेवा, दूधसोडा घ्या, हवा-पालट करा, ह्या कुशीचे त्या कुशीला व्हा; याशिवाय तोंडांतून शब्द काढला असेल तर शपथ! तुमचे कसें काय?

**कोकिलाः**—आपलाच कित्ता मी गिरवतें आहे!

**डॉक्टरः**—नो! नो! तुमचा कित्ता मी गिरवितों आहें! वेल्! मी हे रोगी प्रथम संपवितों! कायरे कसं काय आहे?

**तिसरा रोगीः**—एका वर्षामागं जसा होतों तसाच आहे.

**डॉक्टरः**—ठीक आहे! फीचा हात खालीं कर! (घेतो) धोंडू? नंबर एक क्विनीन मिक्श्चर! [ रोगी धोंडूकडे जातो.

**धोंडोपंतः**—घे लेका, बापजाद्यापासूनचें क्विनीन मिक्श्चर!

**तिसरा रोगीः**—काय हो? किती दिवस असेंच औषध घ्यावें लागणार?

**धोंडोपंतः**—जगांतून क्विनीन, डॉक्टर किंवा तूं संपेपर्यंत! चल, घेतोस का नाहीं? नाहींतर तो पाहिलास ना? (एनिमा दाखवितो.)

**तिसरा रोगीः**-अब्बब् घोड्याची देखील छाती नाहीं हा एनिमा घ्यायची!

**डॉक्टरः**—हात खालीं! जाव, टॉनिक मिक्श्चर! आज वर्षभर औषध देतों; कायरे झालं तुम्हांला बरें न व्हायला? [ तिसरा रोगी जातो.

**पांचवा रोगी**:—डॉक्टरसाहेब, काय भयंकर ऊन लागतं आहे ? उन्हाळे भयंकर लागले आहेत !

**डॉक्टरः**—धोंडू, हाफ पाऊंड मॅग्नेशिया ! अर्धा पाऊंड एरंडेल !

**पांचवा रोगी**:—कायहो धोंडोपंत, लवकर बरें वाटेल ना ?

**धोंडोपंत**:—हं चला ! आधीं औषध घ्या मग सांगतों ! उन्हाळे लागले होते ना ? जा आतां पावसाळे सुरू होतील !

**कोकिलाः**—डॉक्टर, दर वेळेस थरमामेटर लावलंच पाहिजे का ?

**डॉक्टरः**—तर ? त्याशिवाय तपासणीला शोभाच नाहीं ! अंगठ्याला नुसती ठेंच लागली असली तरी हा सेरिमनी झालाच पाहिजे ! ( इतक्यांत एकजण पत्र घेऊन येतो व देतो. )

**डॉक्टरः**—ओहो ! वंडरफुल ! काय ? कपिला आणि धेनुवल्लभ एंगेज्ड् ? कॉंग्रॅच्युलेशन्स् ! कॉंग्रॅच्युलेशन्स ! हार्टी कॉंग्रॅच्युलेशन्स ! वेल् ! कोकिल, सी धिस् ! कपिलेनं आघाडी मारली शेवटीं तुमच्यावर !

**कोकिलाः**—मला तरी वाटलंच होतं हें भाकित ! बरं झालं ! येवढं नाहीं कांहीं मोठंसं वाखाणण्यासारखं झालं ! आतां मनांत चुरमुरे खाऊन काय उपयोग !

**डॉक्टरः**—हो, बरी आठवण झाली ! धोंडू ! हीं चार प्रिस्क्रिप्शन्स् ! आपले गट्टुलाल कौन्सिलर ! पोटॅश आयोडाईड, मिक्श्चर ! ताबडतोब रवाना कर ! तसेंच प्रोफेसर ठोंब्यांना कोबायनामिक्श्चर ! चल ताबडतोब. तसेंच ६०६ सॅल्व्हरसम् इंजेक्शन् वराहशास्त्र्यांना घ्यायचं आहे तिकडे मी जातों ! कमलांग, कोकिल लेट अस गो ! चला प्रथम धेनुवल्लभाकडे जाऊं !

**एक रोगीः**—अं अं ! अहो डॉक्टर, मला पहा हो !

**डॉक्टरः**— अरे, हा पुन्हा कण्हायला लागला ! मी म्हटलं यानं आपलं आख्यान आटपलं असेल ! इतकी आम्ही ओढाताण करीत आहों तरी नशिबाची दोरी बरीच बळकट दिसते ! धोंडू, त्याला काय होतं आहे पहा ! विचार !

**रंगरावः**—(सलाम करतो) सर्व खैरियत आहे ! नागमोडीच्या बोळांतलें मेन गटार तुंबून फुटल्यामुळं समोरच्या दोन घरांतलीं माणसं बुडून मेलीं ! तुम्हांला वर्दी द्यायला प्रेसिडेंटनीं सांगितलं आहे ! बाकी खैरियत !

**डॉक्टरः**—ओ ! ड्रॉउनिंग केसिस ! ऑल राईट ! एनिथिंग मोअर ?

**रंगरावः**—वेताळपेठ चौकांतील पाया खचल्यामुळें, आज चार महिने झुलत्या मनोऱ्यासारखीं झालेलीं दोन, तीन मजली घरें, कोसळून घरांतल्या भाडेकऱ्यांचीं बायकामुलें आणि रस्त्यांतल्या चार माणसांचा चेंदामेंदा झाला ! बाकी सर्व खैरियत !

**डॉक्टरः**—ओ ! कांपाउंड फ्रॅक्चर्स ? स्कलफ्रॅक्चर्स ! एनि मोअर ?

**रंगरावः**—गांवच्या सेटलिंग टँकमध्यें कॉलऱ्याच्या रोग्यांचे कपडे धुतले गेल्यामुळें शहरांत धडाकून कॉलरा सुरू झाला आहे ! बाकी खैरियत आहे !

**डॉक्टरः**—ओ ! कॉलरा एपिडेमिक ! कॉलरा केसिस ! एनि मोअर ?

**रंगरावः**—एन्फ्लुएन्झा, क्षय, देवी, प्लेगची मृत्युसंख्या काल रात्रीं बारा वाजेपर्यंत एकंदर १५० सच होती ! बाकी सर्व खैरियत आहे !

**डॉक्टरः**—लिटल् मोअर, ए बिट मोअर, किंचित् जास्त आहे ! वेल्, एनि मोअर ?

**धोंडोपंतः**—अहो रंगराव, सांगून टाका; सगळा गांव पेटायचाच काय तो शिल्लक आहे. बाकी सगळी खैरियत आहे !

**डॉक्टरः**—गो टू हेल विथ युवर खैरियत ! कमलांग ! कोकिल !

**रंगरावः**—हो, बरी आठवण झाली धोंडू, माझ्या घरांत सगळीं माणसं ओळीनें अंथरुण पसरून पडलीं आहेत रे, हिंवानें पटईपर्यंत थडथड उडताहेत ! कांहीं तरी तुझ्या बचनागाला सांगून चांगलें औषध बनवून देरे !

**धोंडोपंतः**—बचनाग देणार कपाळ तुझं ! याचा गडबडगुंडा पहातां पहातां जन्म गेला माझा ! आमच्या डॉक्टर बचनागाच्या गडबडगुंड्याचा एक कटाव केला आहे ! तो पाठ करून टाक ! ( कांहीं रोगी येतात ) ऐका लेकांनो, तुम्हीही ऐका. आज हा धोंडोपंत खलबत्ते सर्वत्रांना फुकट विद्यादान करतो आहे ! म्हणजे कांहींतरी तुमच्या खेपा चुकतील. हं हा घे. म्हण मोठ्यानदां !

रंगरावः— पद

डॉक्टरजींचा गडबडगुंडा पठण करा रे हा निका। पुन्हा न त्याच्या मुखावलोकनिं वरचेवर येइल घटिका ॥ धृ० ॥ हिंवतापावरि घे क्विनाईन। डोकेंदुखिवरि फिनॅसिटिन। अमांश हगवणी क्लोरोडिन। घे जंतकृमीवरि सँटोनाइन ॥ १ ॥ बलपुष्टीवरि ईस्टर्न सायरप, लोह, कॉडलिव्हर, स्ट्रीकनाइन! बद्धकोष्ठ जरि मॅग्निशिया घे, कानिं ओपियम ग्लिसराईन ॥ २ ॥ नामर्दीवरि कॅनथार्डिस घे, ठणक सुजेला आयोडिन! दाढ दुखीवर कापुर कोकेन, शिणभागावरि पोर्टवाईन ॥ ३ ॥ डोक्यावरतीं बोरिकलोशन। गांठ गळूंला फोमेंटेशन। क्षयावरि घे स्कॉट्स इमलशन। प्लेगालागीं इनाक्युलेशन। गोंवर मधुरा सेग्रीगेशन। देवीलागीं व्हॅक्सीनेशन। हिंवतापाला घे इन्‌जेक्शन। हड्याव्रण जरि अँप्युटेशन। कांहीं रोगां सरकमसेशन। उपदंशावरि आयोडाईड। उन्मादावरि घे ब्रोमाईड। खरुज नायटे झिंक आक्साईड। कामापुरतीं सांगितलीं हीं नित्य करावीं श्रवण पठण ॥ ऐक प्रतिज्ञा गुण जरि न ये डॉक्टरजीचा बा लटका! ॥

धोंडोपंतः—आणि जिवाला कंटाळलाच असला तर चार मोठ्या डाक्टरांची मीटिंग भरवून, तें, आपलें उंदराला घालतात तें बेरियम् सलफाईड? हं ढोसा! आणि पासोडी घेऊन निजून रहा! बिचारं असं मनमोकळं औषध आहे कीं, उंदीरघुसीला घाला, गोरगरिबाला घाला, संस्थानिकाला घाला, राजाला घाला! मुळींच दुजाभाव नाहीं! पंधरा मिनिटांत साफ्! चंबूगबाळें आटपून एकदम महाबळेश्वराच्या ऐवजीं कैलासाचा रस्ता! बरेच दिवस तुम्हीं खितपतां, पाहिजे का कोणाला? चला रंगराव, एवढीं कौन्सिलरांचीं औषधं बनवून आलोंच तुमच्या मागोमाग!

## प्रवेश तिसरा

[**स्थळ**:-धेनुवल्लभाचे घर. पात्रें:-**धेनुवल्लभ, कपिला** व **पांडोबा.**]

**धेनुवल्लभः**—याला म्हणावं चातुर्य ! याला म्हणावं नशीब ! येवढी मोठी विद्वान् पंडिता; पण आणिली कीं नाही घेरून ! पहिल्या दिवशींच मी तिच्या डोळ्यांतलं पाणी ओळखलं आणि मनांत खूणगांठ बांधली, कीं जरी हिच्या डोळ्याची भाषा मुकी असली तरी कधीं ना कधींतरी ही आपल्याशीं गुलगुल गोष्टी करणार ! आमचं पहिलं कुटुंब मरून एक वर्ष झालं ! लवकरच लग्नाचा योग जुळवून आणणार होतों ! पण आतां आम्ही मुनसिपालिटीचे प्रेसिडेंट झालों म्हणजे चार विद्वान् मंडळी, मॅजिस्ट्रेट, शेटसावकार, कलेक्टर वगैरे आमच्या घरी पार्टीला येणार, मला गव्हर्नरच्या लेव्हीला वरचेवर जावें लागणार ! अशा वेळेस एखाद्या कोंकणांतल्या रहाटगाडग्यांत कशाला मान अडकून घ्यावी पुन्हा ! बरं ! एखादी कोंकणदेवी पतकरलीच तर ती कसली शिकते इंग्रजी साहेबलोकांशीं बोलायला ? आणि आम्ही तर आतां ताबडतोब प्रेसिडेंट होणार ! तेव्हा आतां हें जुळावं कसं, या विवंचनेंत पडलों होतों ! एक दिवशीं केली जिवाची हिम्मत आणि स्पष्ट विचारलं, कीं कपिलाबाई ! मी तुमच्या चरणाचा दास आहे, मला आपल्या कृपाछत्राखालीं, सांवलीखालीं, वळचणीखालीं, मला निवारा द्या. एकंदरींत तिला माझे सिमल्याच्या बँकेतले पैसे, दागदागिने सर्व दाखविले आणि सांगितलं, कीं माझ्यासह हें सर्व तुमच्या चरणावर वाहिलं आहे ! असं म्हणतांच तिचे डोळे किलबिले होऊन बोलूं लागले ! लागलींच धिटाईनं हात धरून विचारलं कीं, ह्या डोळ्यांच्या मुक्या भाषेचं तुमच्या मुखानं एक वेळ भाषांतर करून सांगा. ताबडतोब एप्रिल पहिलीचाच मुहूर्त ठरवून झटपट साखरपुडा केला आणि दोघांच्या सहीचीं कार्डं पाठविलीं सर्व लोकांना ! पांडू, ये. वेळेवर आलास ! काय रे पांडू ! तुला आमची निवड आवडली कीं नाहीं. ? अगदीं खरंच सांग.

**पांडोबाः**—तें काय सांगावं महाराज ! हंस नेहमीं मोतींच खाणार ! नाहीं ! नाहीं ! नाहीं ! तुमच्या धोरणापुढं हद्द आहे बुवा अगदीं ! आतां मोटा-

रींत जवळ-जवळ बसलांत म्हणजे जोडा अगदीं लक्ष्मीनारायणासारखा शोभेल !

**धेनुवल्लभः**—काय रे पांडू, तुला एक नाजूक प्रश्न विचारतों.

**पांडोबाः**—बेलाशक ! कोणच्याही नाजूक कामावर माझी योजना करा अन् मग पहा पराक्रम !

**धेनुवल्लभः**—कायरे हिची जात कोणची असावी ? मला विचारायला धीरच झाला नाहीं. नाहींतर रागावून म्हणायची कीं ' माझ्या जातीवर प्रेम आहे का माझ्यावर ? '

**पांडोबाः**—खरें म्हणाल तर मला देखील अजून तिच्या जातीचा पत्ता नाहीं ! आपल्याला त्याच्याशीं काय करायचं ? कांहीं का असेना ! जगांतल्या कोणच्याही स्त्रीजातीच्या मूलतत्त्वांत भेद नसायचा ! हो, बायको म्हटली म्हणजे इथून तिथून अडाणी, भित्री, उतावीळ आणि भांडकुदळ असायचीच, समजलांत !

**धेनुवल्लभः**—खरं आहे ! आणि ही फॅशन सुरू झाल्यापासून सांगितलं तरच धंदा आणि जात कळायची !

**पांडोबाः**—कांहीं असेना, ती जरी अगदीं तपस्वी ब्रह्मकुलांतली नसली तरी अतिशूद्रही नसावी. फार उत्तम झालं एंगेजमेंट ठरवून टाकली तें.

**धेनुवल्लभः**—उगीच नाहीं ! काय तुमचं इंग्रजींत एंगेजमेंट म्हणतात ! अरे, नुसत्या विसारपावतीवर दोघांच्या सह्या झाल्याबरोबर वीस हजारांचे दागिने आणि पंचवीस हजाराचा चेक फाडून दिला ! काय रे आमचं लग्न लावायचंना ?

**पांडोबाः**—कशाला जातां, जातकुळीच्या आणि सशास्त्र संस्काराच्या भानगडींत. सगळ्यांत उत्तम रजिस्टर करावं !

**धेनुवल्लभः**—पण त्याला तरी लग्नच म्हणतातना ?

**पांडोबाः**—हो तर ! त्याचाही अर्थ आणि परिणाम एकच !

**धेनुवल्लभः**—असो ! नेहमीं व्यापारांत म्हणतात कीं माल उतावीळ नसतो, गिऱ्हाईक उतावीळ असतं; तें कांहीं खोटं नाहीं.

**पांडोबा:**—माल काय विचारतां रावसाहेब! कपिलाबाई म्हणजे तुम्ही असं समजा कीं प्रेमाचं जणुं सरोवर आहे.

**पद**

**लावण्याचें सुबक सरोवर चारुमुखीं दिसतें॥ जनमन हरुनी तनुविक्षेपें तरंग उसळवितें॥ धृ०॥ बाहुद्वय मृदु मृणालपरि ते नेत्र मीन गमती॥ केशपाश शैवाल, कुंडलें मकरापरि गमती॥ १॥ पीनघनस्तन, चक्रवाकखग हृदयस्थलिं असती॥ करकंकण मधुमंजुरवानें गमतीं कुजबुजती॥ २॥**

तिच्यावरून सर्व संपत्तीचं लिंबलोण करावं. असं माणूस मिळत नाही! नुसतं निमित्ताला तिचं पहिलं लग्न झालं होतं! अहो, खाकेंत प्लेगचा गोळा घेऊनच नवरा बोहल्यावर उभा होता! अंतरपाट पडला तोच नवरा नवरी आणि अंतरपाट तीन दिशेला तिघेजण गेले! खरे त्यांचे मालक तुम्ही होतां! एप्रिल पहिलीचा मुहूर्तही आपण मोठ्या धोरणानं धरलांत? त्या दिवशीं आपण राजमान्य, देशभक्त आणि कपिलापति अशा त्रयीच्या आनंदांत खास निमग्न होणार!

**धेनुवल्लभ:**—तुझ्या या गोड स्वभावानं व इमानदारीनें तूं मला जन्माचं ऋणी करून टाकलं आहेस! माझ्या प्रियेचं तूं किती मोहक वर्णन केलंस! इतक्या मार्मिक सौंदर्याची मला खरोखरच कल्पना नव्हती! आम्हां धंदेवाल्यांचं अशा बाबतींत इतकं बारीक लक्ष नसतंच मुळापासून. नुसती वेळ मारून नेण्याकडेच मनाचा फार ओढा! काय रे पांडू? हें सगळं तर इसारपावतीपर्यंत ठीक जुळून आलं; पण ती आमची कपिला आमच्या घरीं कां अजून राहायला येत नाहीं? आज आठ दिवस झाले इसारपावती होऊन, अजून मला एका हाताच्यादेखील अंतरावर येऊं देत नाहीं, तेव्हां हें कसं काय? ह्या सुधारलेल्या बायकांशीं लग्न केलं म्हणजे असंच लांबून लांबून लेक्चर ऐकून जन्म काढायचा कीं काय?

**पांडोबा**:—असं कुठं होतं रावसाहेब! आपली नुसती एंगेजमेंट ठरली आहे. अजून लग्न नाही झालं. अहो, आतां हां हां म्हणतां महिना निघून जाईल! ह्या पहा, नांव काढायचा अवकाश कीं हजर! त्या पहा कपिलाबाई कोणाशीं बोलत बोलतच इकडे येत आहेत.

**धेनुवल्लभ**:—पाहूं! पाहूं! वारे वा! आपण डाव तर जिंकला! काय माणूस आहे! काय माल आहे!

**पांडोबा**:—रत्न आहे रत्न! आजपर्यंत यांना पारखी भेटला नव्हता. पहा! वारे वा!

**धेनुवल्लभ**:—पांडू! पांडू! वर्णन कर रे! माझ्या आवडत्या वस्तूचं कोणीं वर्णन केलेलं मला फार आवडतं!

**पांडोबा**:–काय वर्णन करणार मी रावसाहेब यांचं? अहो! आपण दिलेल्या मोत्यांच्या दागिन्यांच्या तेजाची आणि त्यांच्या लावण्यप्रभेची एकमेकांत चुरस लागली आहे पहा! तें पहा, ह्या दोन शुभ्र तेजांत मधून मधून हास्याच्या कशा लहरी उचंबळताहेत! हा पहा, मधेंच डावा डोळा जरा अल्लडपणानं आकुंचित केल्यामुळं ओतलं पाणी काय चमक मारतं आहे! हे कर्दळीवन! हें कमलवन! ही रत्नाची खाण! हा लावण्याचा उपसागर! म्हणूं तरी काय! कांहीं सुचत नाही!

**धेनुवल्लभ**:—पांडू, तुला देऊं तरी काय! ओहो! काय चालती आहे पण; लाखांत बायको आहे!

**पांडोबा**:—तें काय विचारायचं रावसाहेब! पहा—

**पद**

**लचकत मुरडत नट्टुनि थट्टुनि पथ क्रमि युवति करिणी-परि॥ कोकिलवैखरी वदुनि सुंदरी हास्यपीयुषा अधरिं धरी ॥धृ०॥ सकोप दावुनि किंचित् मुरडुनि अर्धोन्मीलित नयन करी॥ बालिश लाडिक हनु चिंचोळी हलवुनि कुंतल सावरी ॥१॥ भ्रूकुटिकार्मुकें नेत्रशरांनीं विंधित नर सुरसुंदरी॥ दंतकुंद मधुहास्यतरंगें अनंगरंगीं दंग करी॥२॥**

फार काय सांगूं रावसाहेब! बालब्रह्मचाऱ्यानंसुद्धां गोमुखी सोडून गृहस्थाश्रम पतकरावा, अशी यांची योग्यता आहे!

**धेनुवल्लभः**—तुझ्यावरून पंचप्राण ओवाळून टाकावेसे वाटतात! काय खोल आणि मार्मिक दृष्टि आहे तुझी! (कपिला येते) यावं! यावं! आतां अगदीं सत्तेनं तुमच्या घरांत यावं! आपला हा पांडुरंग म्हणजे अगदीं हिरा आहे! अगदीं अष्टपैलू आहे!

**कपिलाः**—म्हणूनच आपल्यासारख्या योग्य कोंदणांत योजना केली!

**पांडोबाः**—काय उगीच स्तुति ही गरीबाची करतां उभयतां!

**शेखहुसेनः**—(पत्र घेऊन येतो व धेनुवल्लभास देतो व तो कपिलेस दे म्हणतो.) अरे वा! ये मुनसिपालिटीका गिरेबाज खबूतर यहां उडकर बैठा है. सुभानअल्ला! क्या लटकता है! क्यां मटकता है! जैसा जंगलमें मोर नाचता है!

**धेनुवल्लभः**—आमचीं सर्व पत्रं प्रथम यांना द्यायचीं समजत नाहीं तुला?

**कपिलाः**—नेव्हर माइंड डीअर! अच्छा जाव तुम. सब लोगोंकु सलाम बोलो! डीअर! हीप्स ऑफ कॉन्ग्रॅच्युलेशन्स! सगळ्या गांवांतील मोठमोठ्या लोकांकडून आणि मुनसिपलकारपोरेशनकडून ती संतोषपत्रं व आशीर्वादपत्रं आलीं आहेत, यांना सर्वत्रांना आपल्या इथें ठरलेल्या पार्टीच्या निमंत्रणपत्रिका पाठवितें व त्यावरच स्वदस्तुराच्या आभाराचीं एकदोन अक्षरें लिहून पाठवितें म्हणजे एटिकेटला बरं.

**धेनुवल्लभः**—ओ यस्. सरट्न्ली! माझीही सही आपणच करा. पांडू, तें सर्व सामान वगैरे दे त्यांना. [ जवळ जातो.

**कपिलाः**—इश्! इतकं जवळ येऊं नये गडे इतक्यांतच! मग आहेच मी आपली कम्पॅनिअन! [ लिहीत बसते.

**धेनुवल्लभः**—मला एप्रिल पहिली केव्हां उजाडेल असं झालं आहे! अं! अहाहा! पांडू, हिच्याकडं पहात पहात असंच कायम संगमरवरी पुतळ्यासारखं व्हावसं वाटतं! माझ्या भाग्याला पारावार नाहीं. काय सांगूं पांडू; या माझ्या सर्व भूत, वर्तमान आणि भविष्यकाळाच्या भाग्योदयाची कल्पना डोळ्यासमोर बागडूं लागली म्हणजे एकच गोष्ट जिवाला कशीं घरें पाडूं लागते!

आमच्या पहिल्या कुटुंबाशीं दहा वर्षं संसार केला आणि ह्या कुटुंबाशींही आतां होणारच. परंतु या सर्व अफाट संपत्तीला, मानमरातबाला त्या परमेश्वरानं कृपाळू होऊन जर लहानशा चिमुकल्या दुडुदुडु धावून गळ्याला मिठी मारणाऱ्या हंसऱ्या बालकाचा लाभ घडवून दिला, तर माझ्या भाग्याचा सार्वभौमाच्याही भाग्यानं हेवा करावा असं होईल! काय सांगूं? मला अलीकडं ही एकच चिंता आहे! काय करावं? ही परस्वाधीन गोष्ट पडली! केवळ देवाची कृपा पाहिजे!

**पांडोबाः**—हो, परस्वाधीन तर खरीच! बरं, म्हटलं तरी स्वाधीनही आहे!

**धेनुवल्लभः**—तें कसं! तें कसं?

**पांडोबाः**—अहो! व्रतं, दानं, जप, तप, यानं परमेश्वरी कृपा झालीच पाहिजे; तसंच मंत्र, तंत्र, गंडे, दोरे हेही उपाय आहेत!

**धेनुवल्लभः**—पहा बोवा! सारखा निजध्यास लागला आहे!

**पांडोबाः**—रावसाहेब, ही चिंता व्यर्थ आहे तुम्हाला. आपलं हें भावी कुटुंब अगदीं तरुण आणि होतकरू आहे; तसंच आपलंही वय फारसं मर्यादेच्या बाहेर नाहीं. जर ह्या असल्या बहुमोल लावण्यखाणींतलं एखादं बालकरत्न जगांत खेळलं बागडलं नाहीं तर या जगांत मुळींच न्याय नसून अन्यायच आहे असं मी समजेन. रावसाहेब, मी सांगतों अशी गोष्ट होणार नाहीं!

**धेनुवल्लभः**—तूं तसा प्रसंगावधानी आहेस रे, म्हणून तर अगदीं कलेजांतल्या कलेजांतली ही गोष्ट तुला सांगितली! पांडू, तूं वाटेल तितका पैसा माग, मंत्रतंत्र, गंडेदोरे कर किंवा एखादं धार्मिक काय वाटेल तें कर, पण गोजिरवाण्या बालकाकडून या माझ्या मिशा ओढल्या गेल्याच पाहिजेत!

**कपिलाः**—संपलं गडे एकदांचं! डीअर, आपण आपली सिग्नीचर करा गडे याच्याखालीं.

**धेनुवल्लभ**—ठीक आहे. जशी तुमची आज्ञा. [ तो सह्या करतो.

**कपिलाः**—पांडोबा, जगांत पैशाशिवाय सुख नाहीं तें अगदीं खोटं नाहीं आणि माझ्या सुखाच्या मार्गांतला एवढा पैशाचा वाटाघ्याच कमी होता, तेवढा या कृत्यानं मी मिळवून घेतला!

**पांडोबाः**—कपिलाबाई ! या जगांत सुख आहे का सर्व दुःख आहे याचं उत्तर अद्याप मिळालं नाहीं ! या जगांत माझी पदोपदीं भयंकर फसगत होते आहे. कारण सुंदर वाटावा तो नुसता शृंगारलेला पोषाखी दिसतो ! भोळाभावडा वाटावा तो गळेकापू निघतो ! देशभक्त म्हणावा तो उदरंभर सांपडतो ! शूर म्हणून गौरव करावा तो झुरळ पाहतांच उडी मारतो ! कवि म्हणून वाटावा तो माधुकऱ्याच आढळतो ! राजपुत्र म्हणून वाटावा तो स्त्रीपार्टीच ठरतो ! ब्रह्मचारी म्हणावा तो रात्रीं गल्लीबोळ भटकतो ! बर, सावित्री म्हणून वंदन करावं, तो चमत्कार दृष्टीस पडतो !

**कपिलाः**—मनुष्य जसं आपल्याला मानून घेईल तसं त्याला सर्व जग आहे. (एकीकडे) हे गृहस्थ अजून माझ्या मोहिनीमंत्रांत पुरते सांपडले नाहींत. (उघड) पांडोबा, जगांत एकट्यालाच सुख नाहीं, हें तरी पटतं का तुम्हांला ?

**धेनुवल्लभः**—हें पहा तुम्ही अगदीं बरोबर बोलला आणि म्हणूनच मी हा सुखाचा मार्ग शोधून काढला !

**कपिलाः**—होय डीअर ! आणि म्हणूनच मी देखील या स्वयंभू तत्त्वाला, कवटाळून उभी राहिलें ! कारण जिकडं पाहावं तिकडं ही सृष्टि 'अग कपिले, तूं दुःखी कां ? तूं दुःखी कां ?' असे प्रश्न विचारीत असलीशी वाटली ! खरंच डीअर—

**पद**

**आनंदा घ्याया सृष्टीदेवी शिकवी जिवासी ॥ भृंगसंघ गुंजारव करुनी, खगगण मंजुळ गानीं ॥ कुसुमालंकृत डुल्लूनी लतिका ॥ धावुनि तरुस्कंधासी ॥धृ०॥ अंबरिं नाचुनि चपल चंचला ॥ पवन स्फुरुनि करि गान सुमंगल ॥ जलधर गर्जुनी गंभिर नादें ॥ सुचविती मोद जिवासी ॥ २ ॥**

आणि माझा विचार करून शेवटीं मी हेंच मत ठरविलं !

**धेनुवल्लभः**—माझंही मत अगदीं तुमच्यासारखंच आहे ! आणि पांडू, तुझं रे ?

**पांडोबाः**—आपल्या उभयतांचे मतांत मी कायमचा चिकटला जाऊन आपलं सर्वांचंही सृष्टिदेवीच्या शिकवणुकीबद्दल एकमत आहे ! चला रावसाहेब, आपल्या अभिनंदनार्थ कांहीं कौन्सिलर्स दिवाणखान्यांत आले आहेत ! मला मात्र थोडी रजा असावी, कारण आजच मुनसिपालटीची जादा मीटिंग भरायची आहे. तेव्हां तिकडं तेवढा जाऊन आलोंच नंतर आपल्या सेवेला !

**धेनुवल्लभः**—ठीक आहे. चला आपणही आमच्याबरोबर यायचं !

**कपिलाः**—( लाजून ) मला गडे इतक्यांत लाज वाटते यायला !

**धेनुवल्लभः**—ओ नेव्हर माइंड, जाईल हळुहळू लाज सगळी ! लाज हा पदार्थच असा देवानं निर्माण केला आहे कीं, त्याच्यापासून जर मनुष्याला त्रास झाला तर तो वाटेल त्या वेळेस दूर सारून मनुष्याला त्याच्या भानगडी-तून झटकन् मोकळं होतां येतं ! [ जातात.

---

## प्रवेश चवथा

[**स्थळः**-रस्ता. पात्रैः-**धोंडोपंत, रंगराव, शेखहुसेन, अंबू,** व **कोंडिबा.**]

**धोंडोपंतः**—काय रे. तूं म्हणे पहिलं घर सोडून इकडे वराहशास्त्री-बोवांच्या घरीं भाड्यानं राहिलास? संसाराला त्यांचं घर मोठं आटपशीर आहे !

**रंगरावः**—दिसतो आहे खराच रंग तसा ! आणखी चार महिने राहिलों तर सगळा संसारच आटपेल तिथं खरा !

**धोंडोपंतः**—म्हणजे ?

**रंगरावः**—म्हणजे काय ? तें घर सोडून दुसरीकडं मी चार दिवसां-पूर्वींच जागा पहिली. त्या तुझ्या वराहशास्त्र्याच्या घरांत माझ्या आई-बापांची पुण्याईच उपयोगी पडली ! उजेड नाहीं, ऊन नाहीं, हवा नाहीं, पाणी नाहीं, जमीन नाहीं ! असल्या चिलटं, ढेकूण, पिसा, झुरळं, पाली, उंदीर यांच्या त्या पांजरपोळांत, नाहींतर काय प्राज्ञा होती दोन वर्षं काढा-यची ? केवळ वडिलांची पुण्याई !

**धोंडोपंतः**—काय म्हणतोस ? येवढा प्रलय करणारीं पंचमहाभूतें म्हणतात, पण त्यांची देखील वराहशास्त्र्याच्या घरांत शिरण्याची प्राज्ञा नव्हती आं ? भाडेकऱ्यांची आणि त्यांची भेट देखील नाहीं ?

**रंगरावः**—काय प्राज्ञा आहे त्यांची, कीं उंबरठा ओलांडतील ? भाडेकरी जेव्हां त्यांच्या विरहानं चारचौघांच्या खांद्यावर उंबरठा ओलांडून बाहेर पडेल तेव्हांच तो पंचमहाभुतांत नदीकांठीं मिसळायचा ! काय लेकाचा शेतखाना होता पण ! अहाहा ! रांगत शिरावं आणि फरफटत बाहेर पडावं ! बरं नाहणीघर, धुण्याची जागा, अंगण, सगळं शेवाळ्यानं आणि निसरड्यानं हिरवंगार ! जरा पाय ठेवायचा अवकाश, कीं गेलाच चार हात लांब तिकडं पाय ! माणसं घरांत वावरायला लागलीं की मनुष्यं चालताहेत कां घसरफुगडी खेळताहेत अशी भ्रांत पडायची ! बेशरम ! आणि लेकाचा खणीं दीड रुपया भाडं मागत होता ! हे मालक म्हणजे भाडेकऱ्यांना जनावरं समजतात कीं काय ?

**धोंडोपंतः**—बरं, पण मालक तरी कसा काय होता ?

**रंगरावः**—अरे, कसला बेटा मालक तो वराहशास्त्री !

### पद

**अरे मालक कसला हरामि गमला निर्दय मारेकरी ॥ मारी घरांत भाडेकरी ॥ धृ० ॥ बापजाद्यांनीं बळदें बांधिलीं त्यावरि तुकडे भरी। लावितो तूप मिशीला वरी ॥ १ ॥ खांब मोडके पोकळ तुळया भृंगराज पोखरी ॥ धुळीचा पर्वत पटईवरी ॥ २ ॥ अंधेराची शिकस्त लोंबति जळमटें शिक्क्यापरी ॥ पालही चुकचुक करि भींतरी ॥ ३ ॥ उंदिरघुस कंबरभर प्रतिदिन माजघरां पोखरी ॥ नेला पाताळिं भाडेकरी ॥ ४ ॥ घरीं न तोटी विहीर हिरवी शेवाळानें वरी ॥ पाझरे आळीचें गटारपाणी वरी ॥ ५ ॥ ढपला पडला खिळा ठोकला मालकीण ही वरी ॥ कडाडे वीज**

**गगनोदरीं ॥ ६ ॥ भीम बकासुर जरी नांदते सांप्रत तैशा घरीं ॥ वाळते कोळ सुदाम्यापरी ॥ ७ ॥ आयुष्याचा काळ कंठितों बाळंतिणिचे परी। सोडिव चक्रगदाधर हरी। हा अनाथ भाडेकरी ॥ ८ ॥**

असा या भाडेकऱ्यांचा छळवाद मांडला आहे ह्या घरवाल्यांनीं ! आणि आमच्या मुनसिपालिटीची बेबंदशाही कौतुकानं मजा पहात बसली आहे !

**धोंडोपंतः**—पण कायरे, ही तुझी मुनसिपालिटी नाहीं कांहीं व्यवस्था करीत ह्या घरांच्या दुरुस्तीचीं किंवा घरं पाडण्याबद्दलची ? चारचार घंटे हे सगळे मेंबरलोक डोक्यावर डोकीं हपटून करतात तरी काय ?

**रंगरावः**—टेबलावर शेणाचा ढीग पाडतात ! अरे, मुनसिपालिटी घर बांधण्याबद्दल कुठें परवानग्या देते आणि चौकशी करते, तें ती पाडण्याबद्दल उठाठेव करणार आहे ? आपल्या गांवांत हीं जीं वेडींवाकडीं नवीन घरं किंवा झुलते मनोरे बांधले जात आहेत ते काय परवानगीनं होय ? लोक परवानगी-अर्जे करतात ! दहावीस हेलपाटे मारतात ! दांत किरकिऱ्या करून एक महिन्यांनीं घर बांधायला लागतात ! आम्हीं गोरगरिबांना दमदाटी करून खिसा गरम करतों. पण एखादा कौन्सिलर घर बांधत असला तर त्यांच्यापुढं, लोटांगण घालून चीफ् ऑफिसराकडे रडत येतों ! चीफ ऑफिसर स्वतःचे आणि आमचे डोळे पुसून नाकासमोर पगारावर दृष्टि ठेवून स्वस्थ बसतो ! एकंदरींत हें असं रहाटगाडगं चालू आहे ! जिथं नवीन घरांची ही रड आहे तिथं भाडेकऱ्यांच्या सुखसोई पहायला कोण सुजून बसला आहे !

**धोंडोपंतः**—आहे खरं बाबा भाडेकऱ्यांचं मरण या दिवसांत ! चला बाबा ! हा आजचा मीटिंगचा शेवटचाच दिवस आहे, वेळेवर गेलं पाहिजे !

**रंगरावः**—अहो आज मीटिंग कशी असेल ! आज पोळ्याची सुट्टी आहे. मी स्वतः पाहिलें, बेगडबाशिंग बांधून पाठीवर हिरवे तांबडे छाप मारलेले बैल गांवांतून मिरवतांना मीं स्वतः पाहिलें !

**धोंडोपंतः**—छे, छे, आज जनरलबॉडीची मीटिंग आहे !

**रंगरावः**—असेल बोवा ! काय सांगावं ! बरं, पण हा शेखहुसेन कां रडत येतो आहे ! [ शेखहुसेन येतो.

**शेखहुसेन**:—इन मेंबरोंको खाना खराब हो जाय? साले उदरभी लोगोंका पैसा अडपझडप दबाते है और गरीबके घर भी गिराते है!

**रंगराव**:—अहो खरंच, गांवांत चाललं आहे तरी काय? सगळं गांव उकरायला लागले आहे?

**धोंडोपंत**:—म्हणजे म्हणतोस काय? आपल्या गांवच्या खालीं दुसरं एखादें ज्वालामुखींत गडप झालेलं गांव सांपडलं कीं काय?

**रंगराव**:—तसं नव्हे हो! मारून गांवातले सगळे रस्ते खोदून भोंवतालचीं घरं बुजवून टाकलीं आहेत!

**शेखहुसेन**:—लेकिन् इन् मेंबरोंके कैसे नही घर खुदवाये गये! तोबा! तोबा! गहजब मचाया है इन लोगोंने! हातमें कुदाली फावडा लेके दो हजार आदमी घुस पडा है गांवमें! क्या हमे जिंदेही कबरस्तानमें सुला देते हो! अजब तमाशा है!

**रंगराव**:—अरे बाबा, आतां आलं लक्षांत! हां! तेंच तें! तुम्हांला आठवतं आहे ना चार महिन्यापूर्वी एकदां मुनिसिपालिटीची स्पेशल मीटिंग झाली होती, मग तेंच बरं हे! त्याला म्हणतात रोडवायडनिंग म्हणजे रस्तारुंदी! आणि ते रस्ते खोदताहेत ना? त्याला म्हणतात ड्रेनेज! अहो पण धोंडोपंत! शेषाच्या टाळूला भोंक पडेल इतकं खोल खणून हें ड्रेनेज पुढं मिळवायचं कुठं?

**शेखहुसेन**:—वा! भाई वा! और वो इनजणीरको, वो उल्लुके पठ्ठेको ये तो पुछना, सब गांवका कबरस्तान बनाकर वो चौडे रस्तोंपर कौन उसके बापजादेके भूत और शैतान सहेल करनेवाले है?

**रंगराव**:—खरंच, इतकें खोल ड्रेनेज खणून तें मिळवावयाचें तरी कुंठ?

**शेखहुसेन**:—वो इनजणीरके मूह्मे?

**धोंडोपंत**:—कायहो, पण गांवाला आपल्या जवळच नदी आहे ना?

**रंगराव**:—पण इन्जनीरचं असं मत पडलं कीं, नदी उंचावर असून गांव खोलांत आहे!

**धोंडोपंत**:—काय काय म्हणतो? नदी उंचावर असून गांव खोलांत आहे? भले रे विलायती पठ्ठे! मग काय गांव नदींत असून नदी गांवांत

आहे म्हणतो काय ? म्हणूनच गांवाचं पाणी पाताळात घालून नदीचं पाणी गांवांत सोडलंन् वाटतं ? हा शेखहुसन्या म्हणतो तसं खरोखरीच ह्या मिटिंग-मध्यें झालं तरी काय ? काय ठरविलं ह्या नंदीबैलांनीं ?

**शेखहुसेनः**—सब लोगोंने हिंदुस्तान छोडकर अरबस्तान या कबर-स्तानमें जाना ! वो इनजणीरकी ऐसी तैसी ?

**रंगरावः**—ऐका तर काय ठरलं आणि झालं त्या मिटिंगमध्ये—

**पद**

**अहो झालें ड्रेनेज सँकशन बहुमोलाचें नवनवलाचें ॥ कीं अगाध चातुर्याचें ॥ कीं अलोट कौशल्याचें ॥ जणुं इन्-जिनिअर, कांहीं ओव्हरशियर, यांच्या प्रदर्शनचि अकलेचें ॥धृ०॥ पायवाटा गल्ली, बोळ पेठा शहर, लख्ख आरशा-परिस बघ व्हायचें ॥ घरंदारं पाडून, रस्ते रुंद करून, व्हेंटिलेशन खालींवर द्यायचें ॥ १ ॥ गली ट्रॅपा धरून, मॅनहोल करून, एअर इन-लेट वर ठेवायचें ॥ घरमोऱ्या जोडून, वॉटर फ्लशिंग करून सेनिटेशन मग वाढवायचें ॥२॥ पाताळांतील पाणी, पंपींग करून वरी, पितरांच्याकडे झुकवायचें ॥ गटारांतील घाणी, खुड्डीमधील पाणी, स्वयंपाकघरांत सहजचि यायचें ! ॥ ३ ॥ सांडपाणी साऱ्या शहराचें धरून, बांगडीयेवढ्या नळांत ढकलायचें ॥ मोठे मोठे जिथें, आडवे पडले तिथें, आम्हीं गरिबांनीं काय बोलायचें ॥ ४ ॥**

समजलांत, त्याचा हा धुमधडाका गांवांत चालू आहे. अरे बाबा, ही युरोपां-तून आलेली अक्कल आहे. आणि ती विकत घेण्याकरितां किती लक्ष रुपयांना बुक्का लागणार आहे कुणाला ठाऊक ! मयासुरनगरीचं तुम्हीं नुसतं वर्णन वाचलं आहे, पण प्रत्यक्ष दर्शन इंजिनियरनं तुम्हांला घडवलं आहे. म्हणजे जिथं जमीन असेल तिथं पाणी दाखवायचं, पाणी असेल तिथं जमिनीचा भास करायचा. तलाव असेल तिथें कचऱ्याचा डोंगर दाखवावयाचा वगैरे वगैरे !

**धोंडोपंतः**—केलंन् खरं बाबा त्याप्रमाणं, आतां उपयोग काय उगीच वितंडवाद घालून? त्या मयासुरानं मुनसिपालिटीला ड्रेनेजच्या घातलेल्या कोलदांड्यांतून ती आतां कशी सोडवावी म्हणून तर आतांची शेपन्नची मीटिंग आहे! हे पहा! मला आधी जाऊं द्या! चला, आमचे इन्फ्लुइंझा मोटारमधून डॉक्टर येतील तडफडत मीटिंगला! मला दवाखान्यांत हजर असलंच पाहिजे.

**रंगरावः**—काल सहज थोडासा पाऊस पडल्याबरोबर गांवांत शंभर ठिकाणीं मेनहोलच्या तोंडांतून हत्तीच्या सोंडेसारखीं कारंजीं उडायला लागलीं आणि वरचीं घमेलीं त्या कारंजाच्या धारेवर लिंबासारखीं नाचत नि तरंगत होतीं!

**शेखहुसेनः**—और कींचडतो ऐसा हद्‌का हो गया है, के हाथीकीभी ताकद नही उसमेंसे बाहार निकलनेकी! हसतें क्यो यारो, कसम है मेरे गंगुजानकी! सच कहताहूं! मैले कचरेके तो ऐसे ढेरके ढेर पडे है वो अल्लामियाही एक जानता है के कुंडीमे कचरा है या कचरेमें कुंडी पडी है? चल भाई रंगराव! आप दोनोबी आपने अंबू गंगूकू लेकर काबूलकंदहार चले जायेंगे! उधर तो साली ये मुनसिपालिटी नही है! मजेसे बकरीयां और दुंबे पाळकर साफ सुथरे हरियालिके और नजरे रोशन फुलझाडोके तल्ले आपने कलेजेको अंबू गंगूकू बिठाकर बदाम, पिस्ते, आक्रोड, अंगोर, सालममिश्री, खूप खायंगे और खिलायंगे! मछलिया उछलते हुवे तालाबका मीठा मीठा पानी पीकर आपने उम्रके रहे हुवे दिन मीठे मीठे काटेंगे! चल, मिया चल! अभी गंगूजानकू बुलाता हूं.

**रंगरावः**—अरे लेका, तिकडं गेल्यावर एखाद्या रोहिल्यानं किंवा पठाणानंच पळविल्यान् तर? काबूलकंदाहारला जातो म्हणे! मुंबईसारख्या राजधानींत भर दिवसां दरोडे घालायला जे पठाण भीत नाहींत ते काबूल-कंदाहारच्या बेबंदशाहींत अंबू गंगू आपल्याला कशा पचूं देतील?

**शेखहुसेनः**—अरे हां यार! येभी एक है! सच कहता है! इसी-वास्ते मै हरहमेश कहेताहूं, के हमारे हिंदुभाई बडे अकलमंद, और धीमे होते है! और नही तो हम! बकरेका गोश खाकर, बकरेके माफकही उलटे

खोपडीसे चलते हैं! आच्छा तो भाई! रोहिलेके डंडेसे आपना मुनसिपालिटीका कीचडही बेहेत्तर है! एक दिन नसीबका चक्कर फिरजायगा!

[ जातात. अंबू ओरडत प्रवेश करते.

**अंबूः**—खबरदार कोंडीबा, येडवांकडं बोलाल तर! मी साफ तुमच्या घराकडं झाडायला मोठ्या पहांटच यायची नाहीं. पाहिजेल तर ह्यो घ्या माझ्या नोकरीचा रार्जीनामा! [ खराटा नि घमेलें पुढें ठेवते.

**कोंडिबाः**—कायग अवकला? लई तोंड करतीस! मी कोन है समजलं नाहीं तुला? हा कोंडिबा पार्लेमिंटाचा मिंबर आहे. कोन शिलेदार है! समद्या गांवच्या लोकांचं परान माझ्या हातीं हायती! मोटा पातिवर्त्याचा दिमाख दावतिया मला! आजपर्यंत ह्यो पट्ट्यानं—कोंडिबानं, तेलणी, तांबोळणी, माळणी, कितीक वाटं लावल्यात! तुझ्या म्हारनीची किंमत काय? चल माज्यासंगं. मी तुझा पगार वाढवतों! मनांत आनलं तर तुझ्या बालाबी हात धरून ओढत घेऊन जाईन!

**अंबूः**—मी न्हाई येनार, तुम्हीं जर धागडधिंगा केलात तर अशीच जाऊन पेरशिडेंटला सांगन पगा!

**कोंडिबाः**—पेरशिडेंट काय माझ्या डोकशीचं क्येंस काढणार हाय? म्याच त्याची धा वेळ हजामत केली हाय. ह्यो पट्ट्याचा हिस्का आन् दरारा तुला ठाऊक न्हाय? आम्ही कमिटीचं मेंबर म्हंजे, जसं काय ब्रह्मराकुस हाओत. ऐक—

पद

**निवडक पुंड। आम्ही कमेटिचे गांवगुंड ॥ धृ० ॥ आम्ही अधिकारमदांध धुंद ॥ आमचे रंगढंग छंदफंद ॥ ब्रह्मघास देऊं ना थांग ॥ बंड झोटिंग ॥ १ ॥ थोतांडी वाद वितंडी ॥ आपसांत बसूं बोकांडीं ॥ बापाची मुरगळूं मुंडी ॥ चंड बोलभांड ॥ २ ॥ फत्तर कट्टर कोणी फेर ॥ कुणी नाफेर कुणिग चौफेर ॥ घराच्याच फोडुं उतरंड ॥ फंडगुंड ॥ ३ ॥ आम्ही ग्रामकर्दमिचे मंडूक ॥ गर्जना करूनि प्रचंड। ठेंगणें करूं ब्रह्मांड ॥ उद्दंड घमेंड ॥ ४ ॥ जन**

**कल्याणाचें बंड ॥ माजवूं पाडुं मुळींना खंड ॥ बहुरुपीच सोंगढोंग ॥ थोतांड कुभांड ॥५॥ तूं कोण कोठलिग भांड । काय लावलस इतुकं तोंड । तुझ्यापरिस किति-काची नोंद ॥ केली सांगोपांग ॥ ६ ॥**

चल बऱ्या बोलानं. माझ्यासंगं आल्यानं जर कांहीं विघडलं तर देईन एखाद्या धामनास्नी सांगून तुला पराचित.

**अंबूः**—मी नाहीं येनार ! मी जाऊन आतां सांगतें बघा पेरशिडेटाला.

**कोंडिबाः**—अर्रर्र बिथारलं काम. अग ! अग ! अग अंबे ! अग ! थांब ! थांब ! थांब ! जाऊन द्या ! पाहून घेऊं पुढं कवा तरी !

---

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळः**—मुनसिपालिटीच्या सभेचा दिवाणखाना. ]

**पांडोबाः**—लोकांच्या अर्जाचे ढीगच्या ढीग सातपुड्यायेवढे आडवे पडले आहेत आणि इकडे पहावं तों सगळा अंधेर ! एकजण इमानें इतबारें पूर्वजांना स्मरून, काम करीत असेल तर शपथ ! आमच्या मुनसिपालिटींतल्या मेंबरांच्यासारखा गरम मसाला मात्र कुठं पहायला सांपडायचा नाहीं ! एक एक प्राणी आकाशांतून ताऱ्यांचे फुटून दगड पडतात ना, तसा अगदीं जातिवंत पडलेला आहे ! या मेंबरांना पाहून, चंद्रावर, मंगळावर आणि शुक्रावर आपल्या सारखेच लोक आहेत हें विधान खरं असल्याचा मला भास होत आहे ! मला वाटतें, मासल्याकरितां देवानें यांना खालीं ढकलून दिलं असलं पाहिजे ! वर्षांतून मुनसिपालिटींतला लाखो रुपयांचा चक्काचूर होतो आहे; पण पैसा कुठं आणि कसा गडप होतो आहे, तो देव जाणे ! देव कशाला जाणे हो, मेंबरच जाणे ! नुसती अंधेरनगरी—झोटिंग पादशाही आहे झालं ! अरे ! अरे दुर्दैवी हिंदुस्थाना ! कधीं तुझा उदयकाल येईल तो येवो ! ह्या लोकांचा हा दोष नाहीं ! पारतंत्र्याचा हा दोष आहे ! कारण ज्या ज्या देशांना पार-तंत्र्याच्या अंधारकोठडीची शिक्षा भोगावी लागली, तेथील लोकांची अशीच

दिशाभूल होते. ह्या पारतंत्र्याच्या अंधारांतून, एकीच्या दिव्य प्रकाशांत दुर्दैवी हिंदुस्थानाला कोण महात्मा नेईल तो नेवो. तोंपर्यंत—

पद

**रड हंबरडा फोडूनि हिंदुस्थाना। दिनवाणा केविलवाणा॥ तव अश्रूंच्या वाहवि गंगा-यमुना, नच येई करुणा कोणा॥ ॥ धृ० ॥ तव हिमनगिं जे मुनि तपले। जनकल्याणा जे झटले। स्वात्मार्पण ज्यांनीं केलें। परवशता तव बघुनी। घालिति खालीं माना॥ १ ॥ तव वक्षःस्थळिं तडफडतीं। अन्नान्न करुनि जीं मरतीं। लेकरें पराधिन होतीं। संकटीं तयांनिं करावा। देवा धांवा कोणा॥ २ ॥ कां परम-पुनित आत्म्यांनों। कां सकल देवतांनों। कां शूर वीर पितरांनो। कलि-बलिनें केलें। सांप्रति गर्वा हरणा। म्हणुनि कां लपवितां वदना?॥ ३ ॥ ही दशा किती सोसावी। कवणास हाक मारावी। नच अंत पहावा देवा। धांवा दीनोद्धरणा॥ ४ ॥**

आज मीटिंग आहे म्हणून सगळ्या मेंबरांना-मेंबरं कसलीं मेंढरंच तीं! नोटिसा पाठविल्या. पण आतां दीड वाजायला आला; अजून एकाचाही पत्ता नाहीं! अर्‍र्! खूर वाजायला लागले! मेंढरं आलीं वाटतं? आपण प्रथम सुनावणीचे अर्ज काढून ठेवावेत झालं! [ शेखहुसेन प्रवेश करतो.

**शेखहुसेनः—**

दोहा

**क्या कहुं प्यारे भाईओं। हम दिन रों रों कर कटते है॥ हिंदुस्थानकी हालत देखकर॥ आखोंसें आसुं बहतें है॥ धृ० ॥ ठैरो प्यारो कहां तक डटोंगे। रोखनेसेभी नही रखते है॥ मुलूख सफाचट मैदान हुवे। देख-कर सीने फटतें है॥ १ ॥ जिस हिंदुस्थानमें धनधान खुषनुमा**

**फूल फूलते है ॥ वहां अब लाखो गोर-गुरबां गेते भूखे सोते है ॥ ३ ॥ चिंधी नही कपडा नही जमीन परसो अस्मान ओढते है ॥ बेवा औरतें और न्हन्नेबच्चे यारो हीरे मिट्टी मे मिळजाते है ॥ ४ ॥ क्या परवर दिगार ! दुनियाके सुलतान ! । ये आवाज नही सुने आते है ॥ यहांतो कत्तल देखकर पहाडभी सीने फोडकर आसूंओंकें नदीया बहाते है ॥ ५ ॥ ऐ हिंदु मुसलमिनो हिम्मत न छोडो, माधवजी ! कहते है ॥ अलबत अपने लिये राम रहिम कुछ सला उपर करते है ॥ ६ ॥**

जाने देव ! ये टंटे फिसाद ऐसेही चलनेवाला ! दिन किसीके रहे नही या किसीके रहेंगे ! ये दिन आ रहे है चाकोंके उलटपुलट तो खायेंगे ! यारो मष्करी नही ! हंसतेहो क्या ? एक दिन अपनेभि नसीबका चक्कर फिरजायगा ! अरे, हां यार, मै तो भूलगया ! अरे भाई पांडुरंगराव ! वो आपना टोल-नाकेवाला मुझे कहताथा के, वो गट्टूलाल मारवाडीने चालीस गाडी माल बगर टोल देते हुवे अपने दुकानमे लेआया ! क्या साला ये लोक तो दिन-दिवाले डाके मार रहे हैं ?

**पांडोबाः**—मरूं देत रे बाबा ! मला कशाला ह्या कर्मकटकटी सांगतोस ? तुझं आणखीन् व्याह्याचं घोडं पाहिजे कशाला ! नुसत्या कडबावैरण बैलांना पाठवण्याच्या पत्रव्यवहारांतच चाळीस बैल मरून पडल्याचा रिपोर्ट आला आहे. एक लाख रुपयांचा डेपोंतला कचरा वाऱ्यानें उडून गेला म्हणून टेलि-फोन आला आहे. बँकेंत पैसा भरणा करतांना पांच हजारांचा एक बदल अचानक नाहींसा झाल्याचं कळलं आहे. ह्या नगाऱ्याच्या घाईंत तुझ्या टोल-नाक्याच्या टिमकीला कोण विचारतो ? अर र् मेंढरं आलीरे आलीं ! तोंड बंद कर ! तोंड बंद कर !

[ **डॉक्टर, चीफ ऑफिसर, ठोंबे, वराहशास्त्री, कोंडिबा, धेनुवल्लभ, प्रेसिडेंट अजागळ, गट्टुलाल मारवाडी** प्रवेश करतात. ]

**डॉक्टर**:—मिस्टर गायतोंडे, आज आपल्याला फार उशीर झाला बुवा! डोंच्यु थिंक?

**चीफ ऑफ़िसर**:—काय हो पांडोबा? आमच्या आधींच मीटिंग भरून बरखास्त झाली नाहींना?

**पांडोबा**:—छे, छे! अजून कुणीच आलं नव्हतं! हे पहा गट्टुलाल, शास्त्रीबोवा, प्रो. ठोंबे वगैरे आलेच!

**डॉक्टर**:—होय ना? दॅट्स् ऑल राईट! मग आपण वेळेवरच आलों! हॅलो! कमलांग मिस्टर गट्टुलाल, प्रोफेसरसाहेब! कमलांग मिस्टर थापाडिया! मिस्टर ठोंबे कमलांग! यू ऑल जन्टल्मेन!

**गट्टुलाल**:—जीगुपाळ! जीगुपाळ!!

**प्रो० ठोंबे**:—सरट्नलीं नॉट! वुइ आर रायव्हल्स फॉर मेंबर्स ऑफ पार्लमेंट! वुइ आर नॉट जन्ट्लमेन!

**कोंडिबा**:—पार्लमेंट हाय! हामिभी पारलमिंटाच मेंबरच हाय!

**गट्टुलाल**:—हुं बी डॉमेजींग कमेटीका चोरमन है! चोरमन है!

**चीफ ऑफिसर**:—कसं काय कोंडिबा? आज आतां शेवटची मीटिंग म्हणून पायधूळ झाडलीत वाटतं इथं?

**कोंडिबा**:—कसचं! कसचं! अलीकडं आमच्या दुकानात लई गर्दी; लई गर्दी; म्हूनशान मीटिंगला यायला येळच होत नाहीं.! नुसतं साबुनपानी मारायापायीं, आन वस्ताऱ्यासनी धार लावाया पायीं, धा पोरं ठेवलींयात नवीन. एकादशी नाहीं, तिथी नाहीं, दिवस नाहीं, रात नाहीं, अक्शी चोवीस तास खरडतुया बगा! नुसतं क्यास टाकाया मुनसिपालटीची गाडी लावलीय जादा! तुम्हांसबी ठावं हायच गट्टुलालजी समदं! तुमचं कसं काय चाललं हाय?"

**गट्टुलाल**:—पेशा जाणो, के जेशी चांदरात है! घीणो पेशो और पेशोणो घी बे पेशो हुयोडो है! वेपार तो धणी चोखा हुयोडो है!

**चीफ ऑफिसर**:—हे पहा प्रेसिडेंट अजागळच आले! अरे वा धेनुवल्लभही आले आहेत बरोबर! अलभ्य लाभ!! अलभ्य लाभ!!

(सर्वजण 'गुड डे!' 'गुड डे!' चा वर्षाव करतात.

**प्रेसि० अजागळ**:—थोडं कलेक्टरच्या बंगल्यावर गेलों होतों म्हणून उशीर झाला! एक्सक्यूज् मी! तसंच येतांना आमच्या धेनुवल्लभानींही कृपा केली इकडं येण्याची, म्हणून त्यांच्या इथें थोडं चहापाणी घेऊन त्यांच्याच मोटारीतून इकडे आलों.

**धेनुवल्लभ**:—सहज म्हटलं काम बघून ठेवलेलं असावं! म्हणजे पुन्हा अडचण नको! आज माझ्यामुळं सर्वत्रांना उशीर झाला त्याची माफी असावी!

**सर्वजण**:—नेव्हर माइंड!

**चीफ ऑफिसर**:—अहो, आमचें हें गुऱ्हाळघर नेहमीचंच आहे! पण आपल्यासारख्याचा लाभ अलभ्य आहे!

**प्रेसि० अजागळ**:—या, असे माझ्याजवळ बसा.

**कोंडिबा**:—गट्टुलाल! मोटार! कल्टूर! मोटार! कल्टूर!

**प्रेसि० अजागळ**:—अहो कारकून, कांहीं सुनावणी अर्ज आहेत का?

**पांडोबा**:—गळ्याइतका पुरला गेलों आहे तक्रारी-अर्जाच्या ढिगांत! बरेच आहेत रावसाहेब.

**प्रो० ठोंबे**:—लेट अस् बिगिन अवर वर्क सीरिअस्ली! ठीक आहे! वाचायला सुरवात करा! सर्व मेंबर्सनीं सूचना उपसूचना खुल्या दिलानं द्याव्यात!

**धेनुवल्लभ**:—ओहो! अजब आहे! काय ज्ञान आहे! मान आहे! दर्जा आहे! अधिकार आहे!

**पांडोबा**:—शेखहुसेन ते तक्रारीअर्जांचे गठ्ठे इकडं आण.

[ शेखहुसेन गठ्ठे उचलतांना पडतो.

**शेखहुसेन**:—सरकार वो तो दसवीस गद्धोंका बोजा है! क्यौं जी पांडोबा! कंत्राक्टरके गधे यहां बुलाऊं क्या उठानेके लिये?

**पांडोबा**:—आणखी कंट्राक्टरचीं गाढवं कशाला पाहिजेत इथें? यांतून ओळखून कशीं काढायचीं?

**डॉक्टर**:—अहो, त्याच्याशीं काय बाचाबाची करतां? चला, वाचा लवकर!

**पांडोबा**:—वाचतों रावसाहेब! धर्मशाळा आणि देवळांच्या [illegible]

कडून पाणीपट्टी आणि भंगीपट्टी माफ करण्याचा अर्ज आहे ! गुरेंढोरें, गोरगरीब, वारकरी आणि पांथस्थ लोकांकरितां—

**चीफ ऑफिसरः**—शट् अप् दॅट पांथस्थ ! बस्स् ! पुरे झाला तुमचा धर्मादाय.

**कोंडिबाः**—धर्मादाय करून करून सगळी पेशवाई बुडवलीत, आतां राहिलेली मुनसिपालिटीही खड्ड्यांत घालायचा चालविलाया वाटतं इचार? काय डॉक्टर, तुमचं काय ओपियम् आहे?

**गट्टुलालः**—ये तो बात सत्य है ! अरे डॉक्टर, चीपचाप कांई हुयो है? बोलोना तुम्हारी योपीयम?

**डॉक्टरः**—ह्या असल्या धर्मार्थ संस्थांतून पाण्याची सांडलवंड, घाण, फार होते व त्यामुळं गांवांत रोगप्रसार वाढतो ! म्हणून तेथून अजीबात पायखाने व तोट्या उपटून टाकाव्यात !

**वराहशास्त्रीः**—वाः अजीबात कांटाच उपटून काढलांत !

**चीफ ऑफिसरः**—माझ्या अगदीं हेंच मनांत आलं होतं. हा उत्पन्नाचा प्रश्न आहे. याचा अगदीं एकानोमीच्या दृष्टीनें विचार झाला पाहिजे !

**प्रेसि० अजागळः**—दॅट्स राईट ! तो अर्ज दफ्तरीं दाखल करा ! युसलेस रॉट ! पुढें वाचा !

**चीफ ऑफिसरः**—पांडोबा ! कचऱ्याच्या टोपलींत टाका ! एकुण एकच !

**पांडोबाः**—अर्ज दुसरा ! सगळ्या घराचा कोळसा झाल्यावर बंब आला—

**डॉक्टरः**—ऑल राइट् ! लोणाऱ्याला कोळसे विकून जागा साफ करण्याविषयीं मालकाला हुकूम द्या !

**पांडोबाः**—तो म्हणतो कीं, इंजिनच बंद पडलं !

**प्रो० ढोंबेः**—बस् करा तो काय म्हणतो तें ! म्युनिसिपालिटी कान्ट डू एनीमोअर !

**चीफ ऑफिसरः**—वेल्, वुई कान्ट हेल्प इट ! बोलून चालून यंत्रच तें ! पडलें असेल बंद !

**प्रो० ढोंबेः**—वेल् ! मिस्टर गायतोंडे तें कां बंद पडलं असावं ? तुमचा काय तर्क आहे ?

**चीफ ऑफिसरः**—वेल्! तें इंजिन अगदीं नवं करकरीत कोरं होतं! त्याची ट्रायल रन घेतलेली नव्हती! शिवाय तें इंजिन तीन इंच सॅक्शनचं असतांना रात्रीं जबरदस्तीनं मोठ्या डायमेन्शनचा नळ जोडण्यांत आला म्हणून तें सॅक्शन घेईना! थोडंसं निघालेलं पाणी कॅन्व्हास पाईप फाटका असल्यामुळं गळून गेलं! सध्यां रिपेरी चालू आहे कारखान्यांत! वुइ कान्ट हेल्प एनी मोअर!

**प्रेसि० अजागळः**—एक्सप्लेनेशन क्वाइट सॅटिस-फॅक्टरी.

**सर्वजणः**—क्वाइट साटिसफॅक्टरी!

**गड्डुलालः**—यस्, यस्! वाईड सॅटिस फॅटरी! वाईड सॅटिस फॅटरी!

**प्रेसि० अजागळः**—नेव्हर माईंड! आय से पांडोबा, थ्रो दॅट रबिश फेराम्या टोपलींत!

**प्रो० ठोंबेः**—त्या पाजी मनुष्याला लिहा कीं, हे मेंबर्स कांहीं त्याच्या काकाचे नोकर नाहींत! आम्ही हीं जीं कामं करतों तीं केवळ आमचा मान-मरातब व दर्जा लोकांत वाढावा म्हणून करीत असतो! आम्ही कांहीं लोक-कल्याणाचा मक्ता उचललेला नाहीं! स्वार्थ हा प्रत्येक प्राणीमात्राला उपजत आहे.

**सर्वजणः**—बरोबर आहे.

**चीफ ऑफिसरः**—तसेंच त्याला आणखी लिहा, कीं फेरवाले, नाफेर-वाले, चक्करवाले, घनचक्करवाले या सगळ्यांच्या आमच्याविरुद्ध तक्रारीच्या सभा भरवून व्याख्यानं देऊन रागावून रागावून काय मुनसिपालिटीच्या जागें-तलें गवत कापून नेणें असेल तें खुशाल न्या म्हणावं. फूल्स्! राऊडीज्! त्या लोकांना लाजा कशा नाहीं वाटत हेंच मला मोठं नवल वाटतं! आय् वंडर!

**धेनुवल्लभः**—काय ज्ञान आहे! काय मान आहे! काय अधिकार आहे! माझे तर डोळे दिपून गेले!

**पांडोबाः**—याला म्हणतात कमालीची मानपानबाजी! ड्रेनेजच्या खळ-ग्यांत रात्रीं गाडीघोडा गडप झाला! खळग्याजवळ कंदील नव्हता तरी दिव्या-ऐवजीं दोन दोन मेंबर्स तरी ड्रेनेजमध्यें उभे करीत जाऊन मला कॉंपेन्सेशन द्यावें! तो म्हणतो—

**चीफ ऑफिसरः**—अहो, तो काय म्हणतो तें नका आतां रडूं तुम्ही ! त्याचं रडगाणं ऐकायला कांहीं आम्ही जमलों नाहीं !

**प्रे० अजागळः**—सरट्नली नॉट ! थ्रो दॅट रबिश ! फूल्स् ! राऊ-डीज् ! गो आन् नेक्स्ट् !

**पांडोबाः**—खाणावळवालीचा अर्ज आहे ! तिच्या घरांतील सांड-पाण्याच्या मोरीला दिलेलं कनेक्शन नादुरुस्त असल्यामुळें पाणी तुंबून भितीला लोणा चढला आहे. जिवाला अपाय होण्याचा संभव आहे !

**चीफ ऑफिसरः**—तिला उत्तर लिहा ! मोरी प्रायव्हेट असल्यास प्रायव्हेट्लीच दुरुस्त करून घ्यावी. मुनसिपालिटीचे लोक केवळ पब्लिक मोऱ्यांकडे पहात असतात !

**पांडोबाः**—दंताडीचा अर्ज आहे ! घराच्या जोत्यापेक्षां ड्रेनेजची लेव्हल् उंच असल्यामुळं घरांतील चौकांत रंकाळ्याचा तलाव झाला आहे ! आणखी चार दिवस हयगय झाल्यास माझ्या पोटापाण्याचं साधन बंद होऊन सतार, सारंगी, तंबोरे, तबले, कृष्णी फताडीच्या घरांत वाहून जाण्याचा संभव आहे. ती म्हणते—

**कोंडिबाः**—प्रेसिडेंटसाहेब ! मी स्वतः पाहून आलो, तक्रार बरोबर आहे ! तक्रार महत्त्वाची आहे ! अन् इलाजबी लवकर झाला पाहिजे.

**गट्टुलालः**—तक्रार तो ठीक है पण इलाज क्या है ? अरे कुंडीबा, कांई हुयो तो भी ! आपना पीच्छाणका माणश है ! अरे भाई चीफ अफ-सर ! आपणा पीछाणका माणश है ! उसे बचावकी थारो खोपडीसे कांहीं जुगत तो निकालो ?

**चीफ ऑफिसरः**—नेव्हर माइंड ! आहे ! इलाज सांपडला ! तिथें एक पंपिंग स्टेशन उभारण्यांत यावं, अशी माझी सूचना आहे.

**गट्टुलालः**—हां हां पंपिंग ठीशाण ! पंपिंग ठीशाण, अरे कुंडीबा, जाणोके जुगत तो रामबाण है.

**चीफ ऑफिसरः**—माझं प्रपोजल सर्वानुमतें पास झाल्यास ठीकच ! याला तीन हजार खर्च येईल !

**प्रेसि० अजागळः**—ब्रेहो ! स्प्लेंडिड ! सर्व मेंबर्सनीं हात वर करून आपलं मत दाखवावं !

**गट्टूलाल**:—प्रेसिडेंटशाब, म्हारी एक बीणती है ! ईशी चांद्राके घरमें काले राते हुं गयोडो छे ! आवते समय, मशकरीके साथ टीका टीपणी बातचीतमें, जीणो परसे पांव फींसल पडीयो तेमा खंदोमां घणी मार बीठा है ! शण्णक शण्ण शण्ण आवते है ! ईशी वासते हांतके बदले पांव उपर करवाको परवाणा देणा ! [ पाय वर करूं लागतो.

**डॉक्टर**—अर्र् गट्टूलाल ! पाय खालीं करा ! पाय खालीं करा ! तुमचं मत दिसून आलं !

**गट्टुलाल**:—अरे भाई म्हारा मत दिखवाणा है !

**वराहशास्त्री**:—अहो गट्टुलाल, पाय खालीं ठेवा. पुरं झालं तुमच्या मताचं प्रदर्शन !

**प्रेसि० अजागळ**:—नमूद करा, ठराव सर्वानुमतें पास झाला म्हणून ! गो ऑन् नेक्स्ट् !

**धेनुवल्लभ**:—काय सत्ता आहे ! काय ज्ञान आहे ! काय अधिकार आहे !

**पांडोबा**:—गांवांत पाऊस पडतांच गळ्याएवढ्या खोलीचा पातळ चिखल होतो तरी हजार पांचशें भोपळे व कांहीं होड्या खरेदी करण्यांत याव्या ! तो म्हणतो—

**प्रोफे० ठोंबे**:—तो झक मारतो ! आतां आमचं म्हणणं ऐका कीं एक वेळ ! द्या फेंकून तो अर्ज !

**डॉक्टर**:—हा कारकून देखील पाजीच मनुष्य दिसतो ! आय् से, थ्रो दॅट रबिश !

**कोंडिबा**:—त्यासनी माझ्या सलूनमधीं दे धाडून ! अक्शी त्याची बीनपाण्यानं करून टाकतों ! दे धाडून ! थ्यो पठ्ठ्यानं ब्रह्मदेवाचंबी जावळ क्येलंया ! दे धाडून त्येला !

**पांडोबा**:—अहो, पणमाझ्यावर कां गरिबावर रागावतां ? मी काय करणार?

**प्रेसि० अजागळ**:—अहो शंख ! [ पांडोबा ओ देतो.

**चीफ ऑफिसर**:—आतां माझे आई, काय राहिले असतील नसतील ते सगळे अर्ज एकदम वाचा !

**पांडोबा**:—पण रावसाहेब मला गरिबाला कां ? मी काय केलं ?

**डॉक्टरः**—हा नमस्कार ! कोंपरापासून अर्जाला ! चला वाचा एकदम सगळे आणि सोडवा आम्हांला !

**पांडोबाः**—ठीक आहे ! वाऱ्यामुळें गांवांत धुराळा फार उडतो—

**डॉक्टरः**—हां, उडूं द्या ! तुमच्या काकाचं काय जातं ? गो ऑन् !

**पांडोबाः**—खटारे खिळखिळे असल्यामुळं पेटींतील कचरा गांवांतच पडून—

**चीफ ऑफिसरः**—पडून ( वेडावतो ) पडूं द्या ! तुमच्या बापाचं काय जातं ? वाचा पुढें—

**पांडोबाः**—कचरा गांवांतच पडून खटारा मुक्कामीं रिकामाच जातो !

**डॉक्टरः**—जाऊं द्या ! जाऊं द्या !

**पांडोबाः**—मग आलां होतां कशाला ? गांवांत केर पसरायला ? तो अर्जांत म्हणतो—

**प्रेसि० अजागळः**—छे, छे, हात टेकले या लोकांच्या पुढें ! अहो शंख ! ( तो ओ देतो ) गो ऑन्, बर्न ऑल दोज ॲप्लिकेशन्स् ! जाळून टाका ते सारे अर्ज. आणि नमूद करा सर्व प्रकरणांचा आज निकाल लागला.

[ नाटक मंडळीचा मॅनेजर प्रवेश करितो.

**शेखहुसेनः**—अरे, अंदर किदर जाता है ?

**मॅनेजरः**—अरे मग माझी दाद कशी लागणार ?

**प्रेसि० अजागळः**—तुम्ही कोण आहांत ?

**मॅनेजरः**—महाराज, मी या गांवांत खेळ करीत असलेल्या नाटक मंडळीचा मॅनेजर आहे. माझा अर्ज आहे.

**प्रेसि० अजागळः**—शेखहुसेन, खुर्ची द्या ! ( स्वगत ) पास आणले आहेत वाटतं ? ( उघड ) काय आहे ?

**मॅनेजरः**—आमच्या खेळावर हा जो आपण नादिरशाही कर बसवला आहे तो काढून टाकावा अशी प्रार्थना आहे ! कारण पाणी बंद करीन म्हणून, भंगी बंद करीन म्हणून, थेटरचें लायसन्स बंद करीन म्हणून, आम्हांला दमदाटी करून आमच्याकडून नाटकाचे पास उकळले जातात ! तुमच्या घरच्या मंडळ्या आणखी गांवांतल्या बाहेरच्या मंडळ्या यांनीं

आमचा खड्डा बहुतेक गच्च भरतो पण आमच्या पोटाचा खड्डा मात्र रिकामा रहातो! म्हणून कर माफ करण्याविषयीं विनंति आहे.

**कोंडिबाः** –आमच्या मेंबरांच्या तरी पोटाचा खड्डा कुठं भरतोया! म्हणून तर हतं येऊन तरफडतों आम्ही!

**प्रेसि० अजागळः**—शेखहुसेन, इसका कान पकडकर हकाल देव.

**गट्टूलालः**—साला कुंपणीका मणिजर हुयोडो है!

**नळवालाः**—अहो, आम्हाला नोटीस न देतांच नळाचं पाणी आज आठ दिवस बंद केलं आहेत. अहो, मांडलंय काय तुम्ही? आतां आम्ही लोकांनीं पाणी कुठलं प्यायचं? कारण तुम्ही अक्कलहुषारीनं आमच्या गांवांतल्या विहिरी होत्या त्याही बुजवून टाकल्यात!

**वराहशास्त्रीः**—पुन्हा घरोघरीं विहिरी उकरा! त्यांत काय?

**चीफ ऑफिसरः**—अहो, कालवा खोदायचं काम सुरू आहे!

**नळवालाः**– अहो, इतके दिवस कालवा खोदतां आहांत; अजून नाहीं का कालव्याला पाणी लागलं?

**कोंडिबाः**—सोडावॉटर प्या! शेखहुसेन, हकाल देव उस्कू!

**एक गांवकरीः**—अहो, आमच्या आळींतल्या मुत्र्यान् संडास मुनसिपालिटीनें आम्हाला न कळतांच काढून टाकले. तुम्ही हा काय जुलूम चालवला आहेत, लोकांवर सरकार! लोकांचें एक राहूं द्या, पण मला गरिबाला तरी अडल्यापडल्या वेळीं इकडे यायची परवानगी द्या.

**प्रेसि० अजागळः**—बेशरम लेकाचा! शेखहुसेन, उस्कू हकाल देव.

**शेखहुसेनः**—अरे गधेकी दुं! तेरी अक्कल क्या मारे गई! अबे उल्लू, क्या तूं यहा पायखाना धुंडनेकुं आया था? चल निकल तेरी ऐसी तैसी?

**प्रेसि० अजागळः**—म्हणून आपले कोणकोणते ठराव आहेत ते पुढें करा.

**प्रो० ढोंबेः**—ठीक आहे! सार्वजनिक हौदावरील जातीजातींचे निर्बंध काढून टाकून सर्व जातींना सार्वजनिक हौद उघडा असावा. याला विरोध व्हायचाच मग जातिभेदाचं पुण्य कां वायां घालवावं?

**चीफ ऑफिसरः**—अहो, पण सार्वजनिक हौद झांकला होता कुणी ? उघडाच आहे !

**वराहशास्त्रीः**—याला माझा विरोध आहे ! अद्याप महार, भंगी, कुणबी मराठा, रोटीबेटीव्यवहार करूं लागल्याचा काळ जवळ आला नाहीं !

**गट्टुलालः**—पंडीतजीको म्हारोभी घाट इंजाणके माफक जोरसे टेंकु है ! शुंदर सुंडीशी चोटी, गोरी पुटरीवाली, शोहावणी लुगाई औरोंके घरमा भीजवाणा नही है !

**कोंडिबाः**—मी माझी पोरगी कंदी म्हाराच्या घरांत देणार नाहीं !

**वराहशास्त्रीः**—आजच हा शिवाशिवीचा प्रकार सुरू केला तर गांवांत खून पडतील !

**गट्टुलालः**—खूण पडीयो ! खूण पडीयो !

[ सर्वजण ' खून पडतील ' ओरडतात.

**प्रेसि० अजागळः**—ठीक आहे ! जशी तुमची इच्छा ! ठीक आहे, नमूद करा ठराव नापास ! या उपर दुसरा ठराव !

**धेनुवल्लभः**—काय ज्ञान आहे ! काय राज्यपद्धति ! काय भयंकर अधिकार हा !

**प्रो० ठोंबेः**—सक्तीच्या मोफत शिक्षणाचा दुसरा ठराव मी पुढें मांडतों ! स्वराज्याच्या इमारतीचें स्थानिक–स्वराज्य हें जोतें आहे व त्याचा पाया सक्तीच्या शिक्षणानें भरभक्कम जर चिणला गेला नाहीं तर हे जोत्याचे दगड निखळून स्वराज्याचा राजवाडा जमिनदोस्त झाल्याशिवाय राहणार नाहीं. सरकारनें आपल्या हातांत मतांचें कोलीत दिलेलें आहे. या कोलितानें अन्न शिजवून पोटभर जेवतांही येतें, किंवा स्वतःच्या घराला आग लावून राखरांगोळी करितां येते ! तरी मतांच्या जळत्या मशालींचा सदुपयोग करण्याकरितां शिक्षण सर्वत्रांना अवश्य दिलें पाहिजे. येवढें बोलून मी विराम पावतों.

**पांडोबाः**—येवढातरी ठराव कृपा करून पास कराच. कारण, शिक्षण-प्रसार झाल्याशिवाय लोकमत तयार होणार कसें ? आपल्या देशांतल्या लोकांना मत आहेच कुठें ? दर हजारीं ज्या देशांत पांचजणांनाच नुसती अक्षरओळख आहे आणि बाकीचे ९९५ आंगठाच दाखवतात,

त्या देशांतल्या लोकांना मत द्यावयाचा काय अधिकार आहे ? कारण, मत म्हणजे अनुभव, अनुभव म्हणजे ज्ञान आणि ज्ञान म्हणजेच शिक्षण ! म्हणून सर्वत्रांना माझी हात जोडून प्रार्थना आहे कीं, येवढा चुकून मांडला गेलेला सक्तीच्या मोफत शिक्षणाचा ठराव तरी पास करावा !

**प्रेसि० अजागळ** —अहो कारकून ! चूप बसा. तुमच्या उपदेशाची आम्हांला जरूर नाहीं. तुमची अक्कल पुरे करा ! पुन्हां असा आम्हांला उपदेश करण्याचा आव घालाल तर ताबडतोब तुमची हकालपट्टी करण्यांत येईल, इतकंच नव्हे तर कौन्सिलचा अपमान केल्याबद्दल खटला भरण्यांत येईल !

**पांडोबाः**—खरं बोललो ! चुकलों रावसाहेब ! क्षमा करा ! हा खरं बोलण्याचा काळ नाहीं हें मी विसरलोंच !

**चीफ ऑफिसरः**—तुम्ही तेवढे शहाणे आणि आम्ही सर्व बोकड आहोंत असं समजतां कीं काय ? खबरदार असला एक शब्द बोलाल तर !

**प्रेसि० अजागळ** —ऑनरेबल मेंबर्सनीं खुल्या मतानं ठराव पास किंवा नापास करावा.

**कोंडिबाः**—आम्हासनी नग शिक्शान ! शिक्शन् दिखील कोलीतच हाय ! आमच्या अस्तुरीला मडम बनवायची नाई !

**गट्टुलालः**—इंग्रेजी पढियो तो शेटाणी भाग जावे और फ़ेशनमें शेटजी व्यापार खोवें ?

**कोंडिबाः**—हा ठोंब्या लई उलट्या खोपडीचा दिसतुया ! साबुनपाण्याचं कोनी काई बी म्हनत नाहीं ! काय हो ! महार भंग्यांसनी शिक्शान देऊन त्येंचा मैला मंग काय आमी काढणार व्हय ? लई राव सांगतासा !

**प्रो० ठोंबेः**—तशी वेळ येणार नाहीं. इंग्लंडमध्यें भंगी आहेत, हॉलंडमध्यें भंगी आहेत. गांवोगांवीं सुशिक्षित भंगी आहेत, चोहोंकडे भंगी आहेत. या गोष्टीचा पूर्ण विचार करून माझा ठराव सर्वानुमतें पास करावा. ( सर्वजण ओरडतात, ‘ ठराव नापास ! ठराव नापास ! ’ ) ठीक आहे. सध्यां गांवांत चालू असलेल्या ड्रेनेजमुळें सगळा गांव उकरून पडला आहे ! ड्रेनेजचें पाणी गांवाबाहेर नेऊन उसाची लागवड करण्याची प्रथम योजना होती. परंतु

लेव्हलिंग चुकल्यामुळें व सांडपाण्यांचा नळ फुंकणीयेवढा लहान बसल्यामुळें उकरून टाकलेली गांवांतील जमीन दोनदोन उंट खोल भिजून चिंब झाली आहे. तरी त्या ड्रेनेजची रिपेरी करण्यात पुन्हा लक्षावधी रुपये न घालतां त्याच पैशानें लागवडीकरितां घेतलेल्या जमिनीवर नवीन वसाहत करून गांवांतच ऊस लावण्यांत यावा! (सर्वजण ऊंस लावा! ऊंस लावा! घरांतच ऊंस लावा असें म्हणतात.)

**शेखहुसेनः**—वा भाई वा! सुभान अल्ला! घरदार तो सफा चट हो गये! अब उपर गन्नाबी लगा जाता है? घरमें गन्ना लगाव! चुलेमें गन्ना लगाव!

**चीफ ऑफिसरः**—प्रोफेसरांचें म्हणणें चुकीचें आहे. पुनः रिपेरीकरितां भरभक्कम रक्कम सँक्शन करून, पुन्हा माणसें पाहून, त्यांना काँट्रॅक्ट्स् देण्यांत यावी! आपल्याच देशबांधवांचा, काँट्रॅक्टरांचा व मोलमजुरांचा त्यावर निर्वाह होणार आहे!

**सर्वजणः**—योग्य सूचना! योग्य सूचना!

**प्रेसि० अजागळः**—नमूद करा. थैलीचें तोंड सैल करून, रिपेरीबद्दल निरनिराळ्या व्यापाऱ्यांना व काँट्रॅक्टर्सना पुन्हा काँट्रॅक्ट्स् देण्यांत यावी. तेही आपलेच लोक आहेत व आपणही तेच लोक आहोंत. [ठराव पास.]

**धेनुवल्लभः**—काय ज्ञान आहे! काय अधिकार आहे! काय सत्ता आहे! काय फायदा आहे! काय हो! हें मुनसिपालिटीचें काम कायदा शिकल्याशिवाय मला चालवितां येणार नाही काहो?

**प्रेसि० अजागळः**—अहो, करायचा काय कायदा? इतके हजारों ऑनररी मॅजिस्ट्रेट्स आहेत! कुठें आहे त्यांची आणि कायद्याची जन्मांत ओळख? पण कोर्टांत हांकलतातच कीं नाही काम? गो ऑन नेक्स्ट्?

**प्रो० टोंबेः**—ठीक! चीफ ऑफिसर, हेल्थ ऑफिसर, वगैरे सर्व तीनशेंपेक्षां वरच्या अधिकाऱ्यांचा पगार शेंकडा ऐशीं टक्के वाढविण्यांत यावा. तसेंच त्यांना स्वतंत्र मोटारी देऊन, शापूर व पेट्रोल ज्यादा देण्यांत यावें. त्यांचें गुणवर्णन मी करीत नाहीं; कारण जनतेला हीं माणसें विदित आहेतच.

**वराहशास्त्रीः**—टोंबेसाहेबांच्या म्हणण्याला मी जबरदस्त टेंकू देऊन

अनुमोदन देतो. त्यांची पगारवाढ व्हावी इतकेंच नव्हे, तर उद्यांपासून नवीन निवडणुकींत येणाऱ्या प्रेसिडेंट, मेंबर्स लोकांना प्रोत्साहन मिळावें याकरितां सध्यांच्या सर्व अंमलदारांचे, कौन्सिलरांचे, प्रेसिडेंटसाहेबांचे संगमरवरी पुतळे तयार करवून गांवाच्या प्रमुख चौकांतून ते स्थापन करण्यांत यावेत म्हणजे त्यांनीं चालविलेल्या अलौकिक देशसेवेबद्दल शहरवासी लोकांना पुतळ्यांच्या गळ्यांतून माळा वगैरे घालून त्यांचा योग्य गौरव-सन्मान करण्याची संधि मिळेल. एवढी उपसूचना करून मी पुन्हा विराम पावतो.

[ सर्वजण ' पगारवाढीचा व पुतळ्याचा ठराव पास ' म्हणून म्हणतात. ]

**प्रेसि० अजागळः**—सूचना-उपसूचना दोन्ही अलौकिक आहेत ! पगारवाढीच्या व पुतळ्यांच्या ठरावाला सर्वांनीं हात वर करून अनुमोदन द्यावें. ( सर्व ' ठराव पास ' म्हणतात. ) नमूद करा ठराव पास म्हणून ! चला आटपा, आणा कोणते ठराव असतील ते पुढं !

**गट्टुलालः**—अहो प्रोफेसर, आमचा आधी, आमचा आधी !

**प्रो० ठोंबेः**—गट्टूलालच्या पिछाडीची मोकळी जागा, तांगास्टँडकरितां व मुतारी बांधण्याकरितां वीस रुपये यार्डाप्रमाणें पंधराशें यार्ड घेण्यांत यावी ! ही जागा महत्त्वाच्या रस्त्यावर असून फारच किंमतीची आहे, एकंदर रक्कम अजमासे तीस हजार होते.

**कोंडिबाः**—ठोंबेसाहेब, माझा दुसरा मांडा ! अर ईच्या ! हे समदं आपआपल पुढं करूनशान पैका दाबत्यात पगा !

**प्रो० ठोंबेः**—कोंडिबा सलूनवाले यांच्या सलूनच्या डाव्या हाताचें पडकें घर शाळेकरितां अडीचशें रुपये दरमहा भाड्यानें दहा वर्षे घेऊन उजव्या हातचें पडकें घर पाडून त्याचें मच्छीमार्केट करावें. किंमत पंचविस हजार.

[ डॉक्टर, चीफ ऑफिसर, प्रोफेसर कुजबुजतात.]

**चीफ ऑफिसरः**—या महत्त्वाच्या ठरावाचा विचार करण्याला पांच मिनिटें सवड द्यावी !

**प्रेसि० अजागळः**—ग्रँटेड ! कसें काय घेनवल्लभ ? तमचें घोड्यावर बसायला शिकण्याचें कुठपर्यंत आलें ?

**धेनुवल्लभः**—जिवंत घोडा लाथ मारण्याचा संभव म्हणून लांकडी घोड्यावर बसायला सुरवात केली आहे.

**प्रो० ठोंबेः**—हें पहा शेटजी, तें कांहीं चालायचें नाहीं! आम्हा प्रत्येकाला चार हजारांच्या प्रॉमिसरी नोटांवर सही करून देत असलां तर हें तुमचें गाडें पुढें ढकलतों! पहा बोवा!

**डॉक्टरः**—नाहींतर आतां हाणून पाडतों; त्याला काय उशीर? पहा बोवा, विचार करा!

[सर्वजण होकार भरतात. कोंडिबा व गट्टुलाल शेवटीं चिडतात.]

**गट्टुलालः**—साला पैसा खाते, खाते, खाते, किती खाते! रातदिन गधेडोंके माफक ये डाक्तरलोगोंका पीषा चरतो है!

**कोंडिबाः**—छदाम देणार नाहीं! नाहीं तर नाहीं! आतांपावतर लई खाल्ला पैका बापाचा तुम्ही.

**गट्टुलालः**—अरे ए! जा जा जा साला! बाटली हेलवीवाला! परमेश्वरी होणा!

**कोंडिबाः**—खिशांतच वस्तरा आणला हाय! हतंच बिन पाण्यानं करतो!

**वराहशास्त्रीः**—तोंड सांभाळ! मुस्काड फिरवून देईन!

**चीफ ऑफिसरः**—ए नाव्ह्ड्या, रस्ता रुंद करून टाकून घरासमोरचं ड्रेनेज उपसून काढीन!

**गट्टुलालः**—अरे जा! गम्पलाष्टर! वो कांई दवाखाणेका पीषाखाणा नही है!

**डॉक्टरः**—अरे होय! कीर्दखतावणीच्या! तें कांहीं खडीच्या राशींत माती दडपणें नाहीं आहे!

**कोंडिबाः**—त्यें काई लेका कडबा वैरणींत पैसा उडवणं नाहीं आहे!

**वराहशास्त्रीः**—तोंड संभाळ! वस्तान्याचा नांगर करीन! वस्तान्याचा नांगर करीन!!

**कोंडिबाः**—तें कांहीं माळणीला फुकट गाळा देऊन भाजी खाणं नाहीं!

**गट्टुलालः**—लोखंड लकडी चूणा भगवाकर बंगला बंधवाणा नहीं है!

**प्रो० ठोंबेः**—ए मारवाड्या! चरबी बाहेर काढीन!

**डॉक्टरः**—टेबलावर आडवा घालून ऑपरेशन करीन!

**गट्टूलालः**--अरे जा! जा!! छुरीकैचीवाला! माणसके कषाई, वो काई रखेलीको सुईण नेमणा नहीं है!

**कोंडिबाः**--सैपाकनीला मास्तरीण नेमून मजा उडवणं नाहीं आहे.

**प्रो० ठोंबेः**--ए नॉमिनेटेडा तीन शेंड्या! तोंड पूस, तोंड पूस! काळं लागलं आहे बूट चाटल्याचं!

**प्रेसि० अजागळः**—ऑर्डेर इन दि मीटिंग! ऑर्डेर इन दि मीटिंग!

**कोंडिबाः**—बसली धाब्यावर आतां मीटिंग!

**चीफ ऑफिसरः**—थांब लेका सलूनवाल्या, दाखवतों तुला हात!

[ एकमेकांत कुस्ती.

**कोंडिबाः**—थांब! तुझं वस्तऱ्यानं नाक कापतों! [ त्यास धरतो.

**पांडोबाः**—घाल पालथा! घाल पालथा!

[ एकमेकांवर खुर्च्या, तक्के, कागद फेंकून मारतात.

**प्रेसि० अजागळः**—आय डिझॉल्व्ह धिस मीटिंग!

**पांडोबाः**—आजच्या सभेचें काम इतकेंच पुरे! [ सर्वजण मध्यें पडून कुस्ती सोडवितात. आश्चर्यानें 'हें काय, हें काय' असें म्हणतात.]

**धेनुवल्लभः**—सभ्यगृहस्थ हो! झाला हा प्रकार फार वाईट झाला! आतां या शेवटच्या दिवशीं आपसांत एकमेकांबद्दल द्वेष, सूड, मत्सर वगैरे ठेवून जाणें, मलाही ठीक दिसत नाहीं. तरी सर्वत्रांनीं सर्वत्रांना क्षमा करून दसऱ्याच्या दिवशीं सोनें वांटतांना जसें भेटतात, तसें भेटावें अशी माझी पदर पसरून सर्वांस प्रार्थना आहे. ( प्रत्येकापुढें पदर पसरतो; प्रत्येकजण 'माझी तयारी आहे' असें म्हणतो. व दुसऱ्यास कुंभार, चांभार, धनगर असें म्हणतात. शेवटीं, 'झालें तें होऊन गेलें' असें म्हणून सर्व एकमेकांस भेटतात. 'धेनुवल्लभ लाख माणूस आहे' असें म्हणतात. )

**प्रेसि० अजागळः**—हा शेवट गोड करण्याचें सर्व श्रेय, धेनुवल्लभ, तुम्हांला आहे.

**प्रो० ठोंबेः**—काय गोष्ट आहे त्यांची! या कोंडिबा! आपण सगळे भाऊ भाऊ आहोंत. (सर्व–'सर्टन्‌ली! वुइ आर ऑल ब्रदर्स! वुइ आर ऑल ब्रदर्स!!', आहांतना? तर मग जोराने इलेक्शनच्या मागें हात धुवून लागून पुन्हा निवडून येऊं या! अगदीं इलेक्ट होऊन येण्याबद्दल प्रत्येकानं जिवाची देखील पर्वा करतां कामा नये. (सर्वजणः—अलबत्.) चला तर मग.

## पद

चला बंधुंनो मुनिसिपैलिटी मेंबर आपण होउं या ॥
कापशेटीची पेंड येथली स्वस्थ बसुन मग चावुंया ॥ ध्रु० ॥
खोट्या कंत्राटास देऊनी मुबलक पैसा खाऊं या ॥
काका मामा टेंडर घालिल, पास करुन तें देऊं या ॥ १ ॥
मार्केट-गाळे फुकट वांटुनी तरुण माळिणी स्थापुं या ॥
आपआपल्या आवडत्यांना सुइण मास्तरिण नेमुं या ॥ २ ॥
नाक्यावरची मालगाडी टॅक्स् चुकवुनि आणुं या ॥
दारापुढती गटार कंदिल पाणी शिंपुनि घेऊं या ॥ ३ ॥
बहुतां शब्दीं मुळीं न गोडी एकया शब्दीं सांगुं या ॥
'स्वार्थ' खरा परमार्थ झूट हें मूलतत्त्व जगिं स्थापुं या ॥४॥

**अंक २ रा समाप्त**

# अंक तिसरा



## प्रवेश पहिला

[ स्थळ —रस्ता. ]

**वराहशास्त्रीः**—आहे काय जुलूम! शंभर ठिकाणीं हिंडलों! जिथें तिथें हा धेनुवल्लभ मधे आड्वा पडतो! ज्याला विचारावें तो आपला धेनुवल्लभाला मतं द्यावयाची म्हणून सांगतो! प्रश्न विचारायचा अवकाश कीं आपले धेनुवल्लभाला द्यायची कबूल केली आहेत असें उत्तर येतें.: पैसा ओतायचा ओतायचा किती? सगळ्या गांवांचीं मतें आपल्याच पेटींत कोंबून घेऊन एकट्याचीच मुनसिपालिटी करतो की काय? तो गट्टुलाल मारवाडी, कोंड्या न्हावी, खंडू परीट, ता हगामचे खाऊन माजलेला बलभीम आखाड्याचा पेहेलवान बक्करखां, सगळेच उभे राहिले आहेत यंदा! त्यांच्यापुढें आपला निभाव कसा लागायचा? अरे! कोण हा? हांय, तोच तो! आपण आतां याच्याशीं अगदीं बेमुर्वतपणानेंच वागावें!

**धेनुवल्लभः**—वराहशास्त्रीबुवा अगदीं गहन विचारांत गढून गेलेले दिसतात! (जवळ जाऊन नमस्कार करतो)

**वराहशास्त्रीः**—याला मी परसांतली भाजी वाटलो होय? शास्त्री म्हणजे काय चीज असते तें यालाही कळलेंच पाहिजे!

**धेनुवल्लभः**—शास्त्रीबुवा, नमस्कार. हे पहा, मी एका अत्यंत नाजूक कामाकरितां मुद्दाम तुमच्या भेटीला आलों आहें!

**वराहशास्त्रीः**—तुमची जरा भाषासरणी बदलाल तर बरं! माझ्यासारख्या विद्वान् तत्त्वमीमांसक पंडिताला तुमचं भाषण अत्यंत विसंगत वाटत आहे! म्हणून म्हणतों कीं, भाषासरणी बदला! म्हणा तर प्रथम, मीं मुद्दाम आलों नसून मी केवळ आल्याचा भास होत आहे!

**धेनुवल्लभः**—म्हणजे काय? मी आल्याचा भास होत आहें? अहो पण, धडधडीत तुमच्यासमोर उभा आहें ना?

**वराहशास्त्री**:—शंकास्पद आहे !

**धेनुवल्लभ**:—वाहवा शास्त्रीबुवा ! तुम्ही आणि मी प्रत्यक्ष संवाद करीत आहोंत, हें सर्व भासमय आहे म्हणतां ?

**वराहशास्त्री**:—निश्चयेंकरून हेंच सत्य आहे, असं मात्र म्हणतां येणार नाहीं !

**धेनुवल्लभ**:—बरं, तें जाऊं द्या. उगीच नको रिकामा त्याचा काथ्याकूट या वेळेला ! मी तुमच्याशीं अत्यंत नाजूक गोष्टीविषयीं विचारपूस करण्यासाठीं आलों आहें. मी एका कुलीन स्त्रीशीं लग्न करण्याचं योजिलं आहे !

**वराहशास्त्री**:—मोठे शहाणेच आहांत ! मला पण त्याचं ज्ञान नाहीं !

**धेनुवल्लभ**:—अहो, पण मी सांगतोंना, विसारपावती होऊन ठरलें आहे म्हणून !

**वराहशास्त्री**:—असं काय ? शक्य आहे !

**धेनुवल्लभ**:—हें पहा, मला कांहीं तरी एक सांगा !

**वराहशास्त्री**:—चला लांब सरा. ( स्वगत ) हा पुन्हा लाडीगोडी लावून सलगीच्या गोष्टी बोलायला लागला. तें कांहीं नाहीं, आपण याच्यावर आपल्या पांडित्याची आणि निस्पृहतेची छाप ठेवून भारलाच पाहिजे.

**धेनुवल्लभ**:—हें पहा शास्त्रीबुवा, असं हिडिसफिडिस करूं नका ! त्या स्त्रीविषयीं—

**वराहशास्त्री**:—हां, हां. चुकी होत आहे ! आत्म्याच्या ठिकाणी लिंग-भेदादि उपसर्ग लावणं धर्मबाह्य असून शास्त्रसंमत नाहीं ?

**धेनुवल्लभ**:—वा महाराज ! असें कसें शास्त्र सांगतें ? म्हणजे काय ? ती स्त्रीच नव्हे म्हणतां ?

**वराहशास्त्री**:—तें काय सांगावें ? असंभवनीय नाहीं ?

**धेनुवल्लभ**:—आणि मी पुरुष ?

**वराहशास्त्री**:—तुम्ही तसे असल्याचा तुम्हांस भास होत आहे !

**धेनुवल्लभ**:—मी पुरुष असल्याचा मला मुळींच भास नाहीं ! मला प्रत्यक्ष डॉक्टरनीं सांगितलें आहे. मी पुरुष त्या स्त्रीशीं लग्न लावणार !

**वराहशास्त्री**:—हें काय भलतंच भाषण करीत आहां? केवळ आत्म्याच्या दृष्टीनें विचार करितां तिचं तुमच्याशीं लग्न लागलं काय, माझ्याशीं लागलं काय किंवा गांवच्या पाटील–रामोशाशीं लागलं काय; आध्यात्मिकदृष्ट्या एकच आहे! कर्म हें फलाशेचा त्याग करून, केवळ लोकसंग्रहार्थ केलं पाहिजे!

**धेनुवल्लभ**:—हा नमस्कार तुमच्या प्रचंड कर्मकांडाला! ह्या.नं लोकसंग्रहाची ही काय भानगड उपस्थित केलीन्!

**वराहशास्त्री**:—तुम्हांला ग्राह्य नसेल तर सोडून द्या. (स्वगत) काय विशाद आहे! माझ्या ज्ञानाची छाप पडलीच पाहिजे! हा जो थोडा घुटमळतो आहे, तोंच आपण येथून पाय काढावा. (उघड) ठीक आहे. मला लोकोपयोगी कामाची अत्यंत निकड असल्यामुळं तिकडं गेलंच पाहिजे. [जातो.

**धेनुवल्लभ**:—हा तरी मला मोठा विलक्षणच गृहस्थ दिसतो! लग्नकर्म देखील लोकसंग्रहार्थ करावं, असं शास्त्रवचन आहे म्हणतो! काय सांगावं? असेलही धर्मसिंधूंत लिहिलेलें! आपल्यासारख्या व्यावहारिक व्यापारी माणसाला कशाला घडणार धर्मसिंधूचं स्नान! अशाच कुणीं येतांजातां चार घागरी डोक्यावर ओतल्या तर स्नान घडायचं! तें कांहीं नाहीं. असा बावनकशी माल हातचा गमवायचा थोडाच! (शेख व गंगू मुजरा करून लखोटा देतात.) हा तर सरकारी दिसतो. [लखोटा फाडून पत्र वाचतो.

**शेखहुसेन**:–हां साहेब! वो पट्टेवालेने आपको देनेके वास्ते मेरेपास दिया!

**धेनुवल्लभ**:—(पत्र वाचून) काय! काय! काय! काय! "मेहेरबान अळूपिष्टणसाहेब बहादुर इलाखे मुंबई यांजकडून कळविण्यांत हर्ष होत आहे कीं, सरकारची आपणावर मेहेरनजर झाली असून, आपणास रावबहादुरचा किताब देण्यांत आला आहे. सदरील किताबाचा बिल्लेपट्टा, वगैरे देण्याचा समारंभ, तारीख, लवकरच कळविली जाईल." बस् बस्! मेरे पितर सरग भये! (पत्राचा मुका घेतो व धावून शेखहुसेनला मिठी मारतो.) अरे अस्मानांतल्या देवदूता, बोल! हे नागकन्ये, बोला तुम्हांला काय देऊं! (सलकडी दोघांसही देतो) अरे धरा मला, अरे पकडा मला! मला हा आनंद आवरेनासा झाला आहे. मी अगदीं हर्षाच्या भरांत हंबरडा फोड-

ण्याच्या बेतांत अलों आहे. ( दोघे दोहीकडून धरतात. धेनुवल्लभ पत्राचा मुका घेऊन वर हात जोडतो. ) हे जन्मजन्मांतरीच्या सोयऱ्या ! अल्लुपिष्टण-साहेब बहादुरा ! पंचप्राणेश्वरा ! तुझ्या उपकाराच्या पर्वतानें पिष्ट होऊन तुझ्या बुटाखालील केवळ पायधूळरूपी मी आतां जगांत उरलो आहें ! हे उपकार मी आतां फेडूं तरी कसे ? भाऊबंदांच्या चुगल्या सांगू कीं हिंदु-मुसलमानांत भांडणें लावूं का सत्यशोधकांना कडेवर घेऊं ? का ब्राह्मणांना शिव्या देऊं ? सहकुटुंब बंगल्यावर येऊं ? कां तुलाच घरीं बोलावूं ? घराला आग लावूं ? कीं सगळं हिदुस्तान पेटवूं ? काय करूं न् काय न करूं !

**शेखहुसेनः**—काय करूं, काय करूं नही करना ? सरकार, अभी आप जो बोले, वा सब बात करना ! एक दो करके नही चलेगा ? सब करना चाहिये ! हा हां ! सब बडे बडे सरदार लोक, क्या दूसरा करते है ?

**धेनुवल्लभः**—काय म्हणतोस ? बहुतेक मोठमोठे विश्वासू मानकरी असेच वागतात ? तर मग मी तरी माणसांतून कशाला उठून जाऊं ? काय करूं ? हे हिंदु-मुसलमानांच्या सापमुंगसांना, ब्राह्मण-शूद्रांच्या कुत्र्यामांजरांना, स्पृश्य-अस्पृश्यांच्या टोणगेबोकडांना, निरंतर हक्कदानाच्या मधुर पुंगीनें गुंगवून त्यांच्या खेळ करणाऱ्या गारुड्या, आतां तुझे उपकार फेडूं तरी कसे ! याउप्पर अंशतः तुझे उतराई होण्याकरितां, हे मांत्रिका, तुझें माझें हेंच नातें अखंड राहणार ! तूं शंकर तर मी नंदी; तूं गारुडी, तर मी मदारी; तूं दरवेशी, मी अस्वल ! जा, जा, सर्व मुनिसिपालिटींतील चप्रासाऱ्या झाडूमास्तर, भंगीमास्तर, कचरामास्तर वगैरे सर्व मास्तरांना व मेंबरांना घरीं मेजवानीला दरबारला घेऊन या.

**शेखहुसेनः**—सरकार, इसकोलके मास्तर बुलाऊं ?

**धेनुवल्लभः**—होय, होय. शाळामास्तर देखील ! भरूं दे एक दिवस तरी पोट त्या बिचाऱ्यांचं माझ्या घरीं ! ही बातमी माझ्या पांड्याला आणि कपिलेला केव्हां सांगेन असें झालें आहे ! [ जातो.

**शेखहुसेनः**—टांगेवाले, छकड़ेवालोंको, छकडे टांगोका लायसन मिल-नेके बखत, उन्होंकी जितनी तालाशी होती है, अगर वो उतनीभी तालाशी इन-लोगोंकी होगी, तो इन् बेवकूफोपर ये मुसीबत आ न पडती ! जाने दो !

क्यौं ! तुझे क्या कहता था ! नसीबका चक्कर फिरजायगा ! रेसग्राउंडपर घोडा लगनेके बदला, घर बैठे यहांके यहां, रास्तेमेंही धेनु-वलभका गधा लग गया ! देख चालीस तोले सुन्ना हैं !

**गंगूः**—अन् हुसन्या, (अंग घुसळते) माझ्यावर तुझं प्यार हाय का नाय ! खरंच सांग, अगदीं तुज्या बाची आन !

**शेखहुसेनः**—अरे प्यारी ! क्या पूछती है ! मेरी जान तुजपर कुरबान है !

**गंगूः**—मंग ल्ये सलकडं आन् इकडं. तवा म्हनन तुझी खरीच पीरीत है !

**शेखहुसेनः**—बस् ! अच्छा तो लेले ! लेकिन देख, मेरी चांदबिबी, मेरेसे बेइमान तो न होगी ! वो इंजणीर, और डॉक्टरकूं देखतेही आखोंकी, चांदमारी तो नहीं चलायगी ! वो मोतीवाले मेंबर के यहां, सुबेंही झाडू देनेके बहानेसे गडप तो न हो जायगी ! देख ! याद रखना, मै मुसलमीन हूं ! नाकही काटलेउंगा ! अच्छा तो, य लेजानी !

**गंगूः**—नाहीं, नाहीं, नाहीं. अक्षी तुज्या जिवाचा उतारा होऊनशान पडून न्हाईन, मंग तर झालं !

**शेखहुसेनः**—इतना प्यार करती है तो ला ! दोनोभी इधर दे. अभी सुनारके यहां जाकर मोहनमाला बनवा ले आताहूं ! (ती दोन्ही कडीं देते) आखर औरतसो औरतही होती है ! अब मै लगाता हूं ! अब यारकूं क्या कम् है !

### पद

**सुलतान शहरके यार हम तो मुनसिपालटीवाले !। नवाब बने है यार हमतो मुनसिपालटीवाले ॥ ध्रु० ॥ ये है पगलों का बाजार !। हमपर नहिं रखना इतबार !। अडप झडपका, माल दबाकर मजा उडानेवाले ! ॥ १ ॥ सीनेसे खींच लगाले। बोसोंके भरदे प्याले । भरी जवानी, शराब तेरी मुझे पीलादे पीले ॥ २ ॥**

---

## प्रवेश दुसरा

[ **स्थळः**—धेनुवल्लभाचा दिवाणखाना. ]

**कपिलाः**—भारी बाई खोडकर स्वभाव आहे हो तुमचा! आज इतके दिवस सहवास झाला असून देखील, तुमच्या स्वभावाचा मला तुम्ही थांग लागूं दिला नाहीं! मी मात्र अगदीं भोळीभाबडी हो! माझं मेलं पोटांत आलं कीं ओठांत येतं. अगदीं कसं तें मनांत ठरत नाहीं. आतांशे अगदी मुनसिपालिटीच्या कामांत इकडचं इकडं व्हावयाला फुरसत होत नाहीं ना? माझं स्मरण तरी होतं का!

**पांडोबाः**—हें पहा कपिलाबाई, आजउद्यांत इलेक्शनला सुरवात आहे! तेव्हां कुठं जाऊन प्राण द्यायलासुद्धां मला फुरसत नाहीं. शिवाय हें पहा, आतां मला तुमचं स्मरण मुळींच होणार नाहीं! तुम्हीच माझं निरंतर स्मरण करीत जा! समजलांत!

**कपिलाः**--पुरुषांची जातच बेमान म्हणतात तें उगीच नाहीं! धेनुवल्लभाच्या संपत्तीच्या पिकलेल्या रानांत, धेनुवल्लभाचं बुजगांवणं उभं करून, तुमच्या सहवासांत खुशाल चारा खाऊन उड्डं बागडूं म्हटलं, त्याचं असंच का परिमार्जन करणार तुम्ही? बरं हो! बरं, बरं, समजलं तुमचं एकदांचं! खोटे कुठले!

### पद

**नरमनिं मुळिं नये कल्पना त्यांना॥ निजहृदयापरि**
**गणिती ललना॥धृ०॥ वागत्रि प्रेमा, किती मनिं ललना,**
**करिती अवमाना॥ कटुवचना वदुनिया, करिती**
**अपमाना॥ १॥**

बरं हो! समजलं तुमचं सर्व अंतरंग! खोटे कुठले! [ रडूं लागते. ]

**पांडोबाः**—हें काय वेड्यासारखं! झालं, झालं, आल्या का गंगायमुना पाण्यावर! ( स्व. ) आज हिनं कांगावा सुरू केलेला दिसतो. मुनसिपालिटीच्या आख्यानाचा इलेक्शनचा आतां तिसरा अंक सुरू झाला आहे तेव्हां थोडी

उरली म्हणून थोडी कळ सोसून हिचा कांगावा असाच थोडा वेळ सहन केला पाहिजे! ( उघड ) हें पहा, मनाच्या निरनिराळ्या रागरंगांत मी तुम्हांला पाहिलें आहे. पण या रुसण्याफुगण्याच्या आविर्भावांत मी तुम्हांला मुळींच पाहिलें नव्हतें, म्हणून जरा चुणुक बघितली! बाकी आपल्या प्रिय वस्तूला, ह्या आविर्भावांत बघण्यांत मोठी मौज असते खरीच! पाहतां पाहतां, ह्या ओठांनीं, गालांनीं, हनुवटीनें, भुवयांनीं काय दंगा केला! उष्ण श्वासांचे झंझावात सुटून, कांचनमेरु कंपायमान होऊन, डोळ्यांत विजा चमकून मोठा गडगडाट होऊन शेवटीं शेवटीं पर्जन्य पडूं लागला! हें पहा, मी मघाशीं जें म्हणालों, त्यांत एक अक्षरसुद्धां खोटें नाहीं! मला तुमचें स्मरण कसें होणार? ज्या मनाचा धर्म स्मरण त्या मनाचेंच जर सर्वस्व हरण तुम्हीं केलेंत, तर मग मी काय करणार?

**कपिला**:—( हंसून ) असं का? मी उगीचे नाहीं म्हणत तुम्हांला खोडकर! काव्यालंकारांत बरेच निपुण आहांत तुम्हीं देखील! पण हें ठाऊक आहेना? सुंदर कवितावधू, ही देखील वैदिक वैय्याकरणीयांना पित्यासारखे समजून, मीमांसकरुक्षांना झिडकारून देते. शब्दच्छल करणाऱ्या राक्षसांना माधुर्यरसाचा कुंभ हातीं लागूं न देतां रसिकांच्या मात्र आपण होऊन सर्व स्वाधीन करते, मी म्हणतें यांतलं मर्म आलंना लक्षांत?

**पांडोबा**:—आलं लक्षांत! कवितारूपी ललनेचें पुष्कळांना चुंबन घडतें पण तिचें हृदय हस्तगत होणें फारच थोड्यांच्या नशिबीं असतें, असाच कीं नाहीं तुमचा भावार्थ—?

**कपिला**:—असाच हो भावार्थ—!

पद

**कळती या रसिकां सुजना। हृदयभावना कामनां ॥धृ०॥**
**लवगुणांसि देउनि महति। विस्तारुनि करिती कौतु-**
**कानां ॥ १ ॥ त्यजुनि दोष करिति सेवना। गुणगणाचि**
**रुचे गुणिजना ॥ २ ॥**

म्हणूनच मी तुम्हांला रसिक म्हणतें. रसिक विनोदानं जरी विपरीत बोलला

तरी वाणींतलं सरसत्त्व जात नाहीं. परंतु नुसते साक्षर मात्र जरा विपरीत झाले कीं राक्षसांच्या पंक्तीला जातात !

**पांडोबाः**—ही पढाईत विदुषी मला थोडीच हार जाणार आहे ! इतक्यांतच आपलें स्वरूप प्रगट करूं नये. थोडीशी अशीच कळ सोसून हिला झुलवावी, त्याशिवाय मुनसिपालिटीचें संमग्र प्रहसन दृष्टीस पडणार नाहीं. हें पहा, येवढें धेनुवल्लभाचें घोडें मुनसिपालटीच्या गांवगंगेंत आपण करामतीनें ढकलून, त्याला स्नान घातलें म्हणजे काम झालें ! त्याच्याच जिवावर स्वार होऊन आपणाला वाटेल तिकडे फेरफटका करतां येईल. पुढील बेत कसा ठरवायचा तो मी या पत्रांतच लिहून आणला होता. म्हटलें, कदाचित् म्हसोबा इथे असलाच तर बेत ठरवायला संधि सांपडणार नाहीं, म्हणून पत्रच लिहून आणलें होतें झालें. हें घ्या ! ( पत्र देतो ) हें पहा ! आठवण करतांच हजर !

[ **धेनुवल्लभः**—हातांत लखोटा घेऊन प्रवेश करतो.

**धेनुवल्लभः**—पांड्या ! मी कोण आहे ? नीट लक्ष देऊन सांग.

**पांडोबाः**—कोण आहे म्हणजे ? सरदार, आपण धूर्त लोकांचे अन्नदाते !

**धेनुवल्लभः**—छट् ! नाही ! सांगा ! ऐकलेंत का ? तुम्ही सांगा ! मी कोण आहे ? आज माझ्यांत तुम्हांला फरक नाहीं दिसत ? काय ? नाहींच ओळखायचें !

**कपिलाः**—इश्श् त्यांत काय ओळखायचें ? आपण या इलेक्शनमध्ये खात्रीनें निवडून येणारे काउन्सिलर नव्हे प्रेसिडेन्ट आहांत !

**धेनुवल्लभः**—छट्, नाहीं ! सांगा मी कोण आहे ?

**पांडोबाः**—सरदार, आपण मनुष्य आहांत !

**धेनुवल्लभः**—छट् नाहीं ! पुन्हां पहा.

**पांडोबा**—नाहीं ? तर मग, ( सभोंवार पाहतो ) छट् ! मनुष्यच आहांत ! कोण म्हणतो नाहीं ? मनुष्यच !

**धेनुवल्लभः**—नाहीं !

**पांडोबाः**—अस्सं ! मग आहे खरं कोडं ! आपण मनुष्यरूपानें कोण व आहांत ? काय सांगावें ?

**धेनुवल्लभः**—हा लखोटा वाचा! सरकारच्या विश्वासांतला, कृपेंतला, रायबहादुर सरदार धेनुवल्लभ!

**पांडोबाः**—रायबहादुर झाला तरी पण मनुष्यच!

**कपिलाः**—छट्, नाहीं! सर्वच रायबहादुर मनुष्य असतात असं नाहीं!

**पांडोबाः**—अस्ं, अस्ं, हे मनुष्यांत श्रेष्ठ; असें तुमचें म्हणणें? अस्सें! नरश्रेष्ठ रायबहादुर सरदार धेनुवल्लभ!! पाहिलेंत सरदार, आत्तांपासूनच काय कैवार घेणें चाललें आहे तुमचा!

**धेनुवल्लभः**—त्यांत काय आहे! आहेच माल तसा बावनकशी!

**पांडोबाः**—व्यापारी माणूस एकंदरींत चौकस असतें खरेंच!

**धेनुवल्लभः**—आतां ह्या ईश्वरी देणग्यांच्या वर्षावावर एकदां मुनसिपालिटींत निवडून येऊन, यांचा कळस चढला, म्हणजे झालें!

**पांडोबाः**—तुम्हाला मुळीं काळजी नको. कपिलाबाई रात्रंदिवस कळस घेऊन हजर आहेत! आपलें निवडणुकीचें मंदीर उभें राहिलें, कीं त्यांनीं कळस स्वाधीन केलाच!

**धेनुवल्लभः**—हें पहा, आतां इतक्यांत सर्व मंडळी जमणार आहेत! तसेंच नायकिणीचें गाणेंही होणार आहे. तरी सर्व व्यवस्था चहा, कॉफी, सोडा, लेमन, वगैरे ताबडतोब करवा. तुमच्याशिवाय आमच्या श्रीमंतीला साजेसा थाट उडणार नाहीं!

**कपिलाः**—आपल्या आज्ञेबाहेर का मी आतां आहे? तेवढ्या आंतल्या तिजोरीच्या किल्ल्या द्यायच्या बरें!

**धेनुवल्लभः**—ह्या घ्या! नोटा वगैरे वरच्या खणांत आहेत. ताबडतोब नोकराचाकरांना सांगून व्यवस्था करा! ( जाते. ) पांड्या, इंग्रजी राज्य म्हणजे बस् बस्! कल्पनातीत आहे! काय मान आहे! काय पदवीदान आहे! कायरे पण, मी हटकून निवडून येईनच ना पण?

**पांडोबाः**—त्याची काळजी नको. हा दासानुदास काय करामत करतो आहे, कल्पना नाहीं तुम्हांला! काल गांवातले झाडून आपल्या वर्गीचे सारे लोक; आल्या अन्नाछत्रात चारून आणून तुम्हांला व्होट देण्याविषयीं बेलभंडार उचलविलें! कालच दोनशें केवारशी कुम्यांना पट्टे अडकवून,

चांभारवाड्याच्या प्रत्येक माणसाच्या नांवावर कुत्रेपट्टी देऊन कुत्रें नोंदवलें ! विचारा ? बेवारशी कुत्रें, एक तरी गांवांत फिरकतें का तें ? दिसलें कुत्रें कीं धर, दिसलें कुत्रें कीं धर असा सपाटा चालविला आहे ! मीं सांगतों तुम्हांला तुमच्या नांवाची लहान पेटी ठेवण्याऐवजीं, मोठी कचऱ्याची पेटी, सॅक्शन घेऊन ठेवणार आहे. त्याशिवाय तुमचीं सर्व मतें मावणार नाहींत !

**धेनुवल्लभः**—शाबास ! हें पहा, या वेळेस पैशाकडे पाहण्याची वेळ नाहीं ! कायरे पण हा कांहीं गुन्हा होत नाहींना कायद्यानें ?

**पांडोबाः**—छट् ! काय बिशाद आहे कायद्यांची ! श्रीमंत, सरदार, रायबहादुर, खानबहादुर वगैरे सरदारांच्या हातून गुन्हा घडूंच शकत नाहीं ! शक्यच नाहीं ! इतरेजनाला गुन्ह्याबद्दल शिक्षा होते पण श्रीमंतांना, अधिकाऱ्यांना, कधींही होत नाहीं; म्हणजे काय, तर ते गुन्हाच करीत नाहींत ! गुन्हा करण्याला असमर्थच असतात !

**धेनुवल्लभः**—काय कायद्यांचा खोल अर्थ जाणतोस !

**पांडोबाः**—काय बिशाद कायद्यांची, बलवंताकडे वक्रदृष्टि करण्याची ! कवड्या पैसा लावून जुवा खेळा, शिक्षा होते ! रेसीसला यात्रा जमते ! वशीकरण, कामोद्दीपक जाहिराती छापा, शिक्षा होते ! लेडीच्या नंग्या नाचाला मोटारींची गर्दी होते ! अनंत सूक्ष्म भेद आहेत ! गरीब मारामारी करूं दे, शिक्षा होते ! अधिकारी बूट मारूं दे, पानथरी वांचवते ! गरीब बोळांत, गल्लींत बसूं दे. शिक्षा होते ! कौन्सिलर मार्केटाच्या चव्हाट्यावर बसूं दे. सुटका होते !

**धेनुवल्लभः**—पांड्या ! पांड्या ! गहजब केलास तूं ! बेट्या, बॅरिस्टर कां झाला नाहींस ?

**पांडोबाः**—हा पहा शेखहुसेन आलाच.

[ **शेखहुसेन, अंबू, गंगू, धोंडोपंत** प्रवेश करतात.

**शेखहुसेनः**—सरकार ! सब मेंबरलोग दौडते आ रहे है !

**पांडोबाः**—कायहो धोंडोपंत, मग ते टांगेवाले ऐकता का होत आठशें रुपयाला ?

**धोंडोपंतः**—छेः ! ते भलतेच धरून बसले आहेत !

**पांडोबा**:—काय, काय ते असें भलतेंच धरून बसले आहेत? काय म्हणतात तरी काय?

**धोंडोपंत**:—रोख पंधराशें अगोदर हातांत पाहिजे म्हणतात. नाहींतर ते कोंडीबा न्हावी याला देतों म्हणतात.

**पांडोबा**:—चढले आहेत लेकाचे फार! नुसतेंच स्वस्थ धरून बसा म्हणावें! बरें, ते तालमींतले काय म्हणतात?

**शेखहुसेन**:—सरकार, वो कहते है,! हर एक पेहेलवान एक महिना बदाम, पिस्ते खुरमा, मुर्गी, खुराक खिलावेंगे तो ओंठ मिल जायंगे, और कहते है, ऊन लोगोंके महेलेमें, मुनसीपालटीके पायखाने नही है! इसलिये खुराक चालू करनेके अव्वल, पायखानेका बंदोबस्त किया जावे! ओर नही तो साफ कहते है की हम वस्तादजीको ऊंठ देंगे!

**धोंडोपंत**—बदमाश लेकाचे, आम्हांला त्यांच्या उंटाची साफ जरूर नाहीं! खुशाल वस्तादजीला उंट देऊन त्याचेंच घर भरवा म्हणावें!

**धेनुवल्लभ**:—हें पहा धोंडोपंत, पांड्या, थोडक्याकरितां मागेपुढें पाहूं नका. जाऊं द्या गेले तर पांच चार हजार. ही वेळ नाहीं फार ओढून धरण्याची! पांड्या, प्रोफेसर लोक काय म्हणतात रे?

**पांडोबा**:—सरदार, प्रोफेसरांची तर या गांवांत अशी खिचडी माजली आहे, कीं कांहीं विचारूं नका. नुसती गर्दी झालेली पाहून एक धोंडा मारा दहा पांच प्रोफेसर्स खालीं पडतील. मिसरूं न फुललेलें युनिव्हर्सिटीच्या अंड्यांतलें नुकतेंच बाहेर पडलेलें पोर एकजात प्रोफेसर म्हणवतें आहे. नुसतें नाक धुतां येत नाहीं त्या पोराला, मग इतर साफसफाई दूरच राहिली! आणखी प्रोफेसरांच्या गर्दींत प्रो० विडीवाले, प्रो० सर्कसवाले व प्रो० चिवडे-वाले, प्रो० चहावाले वगैरे मिसळल्यामुळें, प्रोफेसरांचा नुसता धुमाकूळ उडून गेला आहे! यांच्या मुळींच नादांत पडायला नको! अहो, कुत्रापट्टीवाल्याची आणि प्रोफेसरची, मतांच्या दृष्टीनें एकच किंमत! या बावळटांच्या नादीं लागण्यापेक्षां, पांचशें कुत्रीं सोडतों प्रोफेसरांच्या ऐवजीं! तुम्ही कां भितां?

**धेनुवल्लभ**:—पांड्या, पांड्या, काय, काय करामत आहे तुझी!

बस् बस् गहजब करतो आहेस तूं! गंगू, तुझें कसें काय? तें कांहीं चालायचें नाहीं. तुझ्या वेटाळांतलीं सगळीं मतें इकडे आलींच पाहिजेत!

**धोंडोपंतः**—कां समजलीस ना? गंगे, सगळा महारवाडा तुमच्याकडे लागला!

**गंगूः**—सरकार, अतां महारोडा हाय कुठें बाहेर! संमदा गांवांतच आलाया उठून!

**धोंडोपंतः**—हो, पण त्यांच्या घरोघर जाऊन काम केलं पाहिजे तुम्हीं

**गंगूः**—पण घरं उमगत नाहींत हो! इचारा अंबीला, दहा वेळ फसलों बगा. योक वेळ पिऱ्या म्हणून शिंद्याच्या घरांत शिरलों! रकम्या म्हून बामनाच्या शिरलों! तवा दिला नाद सोडूनशान्. लई लई फसगत होतीया महारवाडा उठल्यापासून! कांहीं इचारूं नका! काल बगा, ही अंबी तुमच्याच घरांत शिरली, आन् जवाका तुमची बायको धावली खराटा घेऊन शिव्या देत आमच्या मागं, तवा उमगलं ह्यो तुमचंच घर हाय, अहो खरं म्हनत्येना! मी सांगितलं अंबीला, कीं ह्यो म्हाराचं घर नाहीं दिसत. तवा मला दाटून आणि झिडकून ही अंबी म्हणते कसं, कीं अग चल बया! ह्यो तर माज्या म्हेवन्याचं घर हाय! पण जवा का खराटा बसला पाटाणींत तवा उमगलं तिला! असं होतया. म्हून म्हटलं कसं करावं?

**धेनुवल्लभः**—मनापासून कामें करा म्हणजे झालें. हो खरेंच, काय रे गंड्या, आम्ही आतां एक दोन दिवस उजाडतांच, मुनसिपल करपुरेशनचे अध्यक्ष होणार! त्यांतुन पडलों रायबहादुर! तेव्हां राजकीय धोरण काय ठेवूं? कारण, माझी आतां देशभक्तांत—पुढाऱ्यांत गणना होईल!

**पांडोबाः**—सरकार! बरोबर आहे! कौन्सिलर लोक बिचारे खरोखरीच मुनसिपालिटीचा धंदा करणारे असून, मूर्ख नागरिक लोकांनीं त्यांच्यावरनी देशभक्तीचा नुसता जुलूम चालविला आहे. त्यांच्या मागें श्रीयुत, देशभक्त, रासभ, किंवा राष्ट्रीयसभाभक्त वगैरे पदव्यांचे भाले टोंचून, नुसती भर दिवसा मोंगलाई माजविली आहे! देशभक्तीच्या, स्वदेशप्रीतीच्या, लोककल्याणाच्या वगैरे भरबाजारांत बीभत्स शिव्या देऊन, त्यांच्या अब्रूचा फजितवाडा मांडला आहे! असल्या भयंकर गुन्ह्यांचा आरोप

त्यांच्यावर लादून त्यांचा लोक दिवसाढवळ्या खून पाडीत आहेत हो ! [ गहिंवरतो. ]

**धोंडोपंतः**—बिचारे गाईसारखे ते निरपराधी असून, हे मूर्ख नागरिक कसाई, त्यांचा गळा कापताहेत. हर ! हर ! इंग्रजी आहे का मोंगलाई आहे ? काय करतील बिचारे ! पोटासाठीं निमुटपणें जुलूम सोसताहेत हो !

**धेनुवल्लभः**—अरे, अरे, अरे, काय रे पांड्या ? धोंडोपंत, असे गहिंवरूं नका ! कायरे, मग हे बिचारे मनांत नसून जुलमानें भलतींच लेक्चरें देतात कारे ?

**पांडोबाः**—काय करतील बिचारे ! कणीक ! कणीक ! निर्जीव मृदंगाला देखील कणकेचा गोळा चिटकवतांच, अवघड बोल बोलायला लागून घुमूं लागतो ! आणि हे तर बिचारे हाडामांसाचे चालतेबोलते धडेवाईक मृदंग ! चांगली कणीक तिंबून गोळा लावतांच, ध्रुपद, धमार, गजपर्णाचा अवघड बोल काढून घ्या !

**धोंडोपंतः**—पांडोबा, म्हणजे काय ?

**पांडोबाः**—अहो धोंडोपंत, तळिराम गार झाला, म्हणजे देशभक्ति, जगदुद्धार, जगत्कल्याण, वाटेल तशी बडबड करायला जीभ वळवळ करायला लागते !

**धेनुवल्लभः**—पांड्या, बस्, बस्. गहजब केलास तूं ! काय मान आहे ! काय लोककल्याण आहे ! मला वाटतें नुसतीं पुस्तकें वाचून, तुझ्यासारखा पंडीत व्हायला मला किती तरी जन्म घ्यावे लागतील ! अरे यक्षगंधर्वा ! मला कडकडून भेट, म्हणजे ताबडतोब मी विद्वान् होईन ! काय रे पांडुरंग ! माझी राजकीय मतें तरी काय आहेतरे ?

**पांडोबा**—सरकार, आपण मुळींच कानकोंडे होऊं नका ! हे जे छापखानेवाले वर्तमानपत्रें भरवीत आहेत, सभा भरविणारे सभा भरवीत आहेत, लेक्चरें झोडणारे लेक्चरें झोडताहेत, हे जे फत्तर, कट्टर, मच्छिंदर, गोरख, जालंदर, देशभर गर्जना करीत आहेत, त्यांना काय मतें ठाऊक आहेत म्हणतां स्वतःचीं ? छू ! नांव कशाला घेतां ! विद्युल्लतेचें स्फुरण देखील क्षणभर टिकेल, पण यांचें मत टिकायचें नाहीं. या प्रदेशांतल्या तेहतीस कोटी ढगांत, असे दहा पांचच करुणाघन महात्मे सांपडतील कीं, जे केवळ ज्ञानानें

जीवकल्याणाच्या भावनेनें, ओथंबून जाऊन जीवांचा यातनारूपी भयंकर दाह शमविण्याकरितां, परोपकाराच्या पर्जन्यानें कोसळून पडतील! पण सरदार, नवल पहा! गर्जना नाहीं! सिंहनाद नाहीं! हें पहा, तुम्ही या अवडंबरांत मुळींच शिरूं नका, आपले चार संभावित लोक वागतात तसे वागा. उजव्याच कानावर पगडीच्या झिरमळ्या लोंबल्या पाहिजेत, असा कांहीं सिद्धांत नाहीं! अहो, डाव्या कानावर झिरमळी लोंबवली! कौन्सिलरचा एक हात सारखा पगडीवर पाहिजे!

**धोंडोपंतः**—दुसरा हात मोकळाच ठेवायचा?

**पांडोबाः**—छट् दुसरा हात आसन स्थिर करण्याकडे!

**धेनुवल्लभः**—पांड्या, तुला काय करूं? कुठें ठेवूं? असें झालें आहे! आज, आज तूं अगदीं मात नव्हे हुचमल्ली केलीस! कायरे, मुख्य तर राहिलेंच! लोकांशीं आणि सरकारी अधिकाऱ्यांशीं साधारण वर्तन?

**पांडोबाः**—वर्तन? जवळ जवळ नर्तनासारखेंच! सरदार, शंभर वर्षे आपण परकीयांच्या सहवासांत, दिवसाचे रात्रीचे असून, अजून त्यांच्या स्वभावांतलें मर्म् ओळखूं नये, ही दिलगिरीची गोष्ट आहे! त्या लोकांना स्पष्ट खरें स्वरूप आवडतें. अधिकाऱ्यांना आणि मतदारसंघांना, उभयतांना खूष ठेवण्याचें वर्तन, केवळ असिधाराव्रतच! थोडक्यांत सांगतों सरदार! आपण नेहमीं रात्रंदिवस सिंहाचें चामडें पांघरून मतदारसंघांत वावरलें पाहिजे! मेघनादासारखी गर्जना केली पाहिजे! आणि अधिकाऱ्यांचें बोलावणें येतांच, सिंहाचा पोषाख बंगल्याच्या फाटकाशीं ठेवून, मूळ स्वयंभू स्वरूपांत प्रगट झालें पाहिजे! साहेबबहादुरांनीं क्रुद्ध मुद्रा केल्यास, शंका दाखविल्यास, सी. आय. डी. च्या रिपोर्टांनें कलुषित मन करून घेतलें असल्यास, स्वयंभू स्वरूपांत ताबडतोब लोळण घेऊन, ईश्वरदत्त कंठमाधुर्याच्या देणगीनें, त्यांचा भ्रम घालवून आपल्या जातीबद्दल खात्री पटविली पाहिजे! इंग्रज खऱ्याचा भोक्ता आहे! इंग्रज खऱ्याचा वाली आहे!

**धेनुवल्लभः**—पांड्या, अरे, कोहिनुरा! मी तुला ठेवूं तरी कुठें? नाहीं! नाहीं! नाहीं मी बोलत आतां! जीवजीवेश्वरा! साहेबबहादुरा! बस्! बस्! काय नर्तन, वर्तन आणि तुझे संकीर्तन आहे!!

**पांडोबा**:—सरदार! हें सगळं ज्ञान मला स्वप्नांत मिळालें बरें! स्वप्नांत दृष्टान्तच झाला म्हणानात! [ **कपिला** प्रवेश करते.

**कपिला**:— अगबाई! काय दृष्टांत झाला तुम्हाला! सांगाच गडे एकदां आम्हांला!

**धेनुवल्लभ**:—बरें का? ह्यानें आतां नुसता गजब केला होता इथें! पांचशें प्रेसिडेंटांनीं लोळण घ्यावी याच्या चरणापाशीं!

**धोंडोपंत**:—हे पहा गायतोंडे, प्रोफेसर ठोंबे, कोंडिबा, गट्टुलाल, आणि वराहशास्त्री आलेच!

**धेनुवल्लभ**:—काय म्हणतां! या, या, या. ( रायबहादुर धेनुवल्लभ की जय!) सर्व आपल्या कृपेचें फळ आहे! आज मी अगदीं धन्य आहे! आजच माझ्या घरचा दसरा आहे! पांड्या, खरं कीं नाहीं?

**पांडोबा**:—संतजन आले घरा!

**धेनुवल्लभ**:—तोचि दिवाळी दसरा! ( सर्वजणः—काय ज्ञानी, विनयी, विनोदी, मार्मिक आहे. असें म्हणून स्तुति करितात.) नाहीं, तें सर्व माझ्या गुरुजींच्या शिक्षणाचें फळ आहे. बस्! बस्! पांड्या म्हणजे किन्नर आहे! सांग, सांग! तुझा स्वप्नदृष्टान्त सांगच आम्हांला सगळ्यांना! पांडुरंगा—सांगाच!

**धोंडोपंत**:—सरदार! यांच्या शीघ्रकवित्वाचा नाहीं वाटतं अनुभव आपल्याला?

**धेनुवल्लभ**:—काय म्हणतां? तें कांही नाहीं? अगदीं स्वप्नदृष्टान्त काव्यमयच सांग तर!

**गट्टुलालः**—बोलो भाई, पांडोबा बोलो! अरे कुंडीबा! शुणो, पांडोबाका सपणा शुणो!

**पांडोबा**:—अहो मला अजीर्णामुळें पित्तामुळें स्वप्नें पडतात झालें! काय पित्तानें पडलेल्या स्वप्नांचा दृष्टान्त ऐकतां? ( सर्वजण आग्रह करितात. )

**कपिला**:—तुमचीं स्वप्नें देखील अगदीं खऱ्यांच्या तोडीचीं असतात! तें कांहीं नाहीं, सांगाच एकवेळ!

**पांडोबाः**—बरें तर ऐका. काल असा पडवींत निजलों होतों पहाटेचा गार वारा लागला, आणि ढेकूणपिसांना न जुमानतां डोळा लागला तो जसा काय मी गांवाबाहेर रानांत चाललों आहे! तारकायुवतीशीं रतिसंगरांत पराभूत झालेला निस्तेज चंद्र विश्रांतीला जात असून, पूर्वदिशा कुंकुम-गुलाल उधळीत आहे, सर्व वृक्षलता, दंवबिंदूंच्या मौक्तिकांनीं विभूषित झालेल्या आहेत, मंद वारा सुटलेला आहे, अशा वेळेला, दूर लांबीवर, चिंचेच्या झाडींत एक जुनाट शंकराचें देवालय दृष्टीस पडलें. जवळपास चिटपांखरूं देखील नव्हतें. मी जवळ गेलों, थोडासा बसलों. तों इतक्यांत देवळाच्या पिछाडीच्या झाडींतून मंजुळ वीणारव ऐकूं येऊं लागला! तसा मी जरा गायनाचा लोभी असल्यामुळें तिकडे गेलों आणि पाहतों तों एका झाडाच्या खादीवर एक प्राणी वीणारव करीत असून, सभोंवताली दुसरे प्राणी, नाचत बागडत असून, जलशाला रंग आला होता. सरदार, ते प्राणी हिंस्र पशु नसल्यामुळें थोडी हिंमत धरून जवळ गेलों आणि पाहतों तों—

पद

**नवल गवसलें नयना हो विपिनीं कपी वाजवी वीणा ॥ धृ० ॥**
**घुःघुःकारें घुबड ताल धरि, ग्रामसिंह करि गाना ॥**
**अंबर कोंदे निनादिं, घालिति नवरस थैमाना ॥ १ ॥**
**साळू मैना हावभाव करी मंजुळ चिवचिवतांना ॥**
**हंसी कोकिल मयूरपंक्ती केका आलापित.ना ॥ २ ॥**
**हरिण, शहामृग, शशक, मतंगज दिसले मज झुलतांना ॥**
**निवडक नंदी पुच्छ उभारुनि तुकविति आपुल्या माना ॥ ३ ॥**
**गर्दभ, खेचर, बोकड, महिषी काय पुसावी दैना ॥**
**कपिवदनावरी छटा विलोकुनि सकल घेति ताना ॥ ४ ॥**

**धोंडोपंतः**—पांडोबा, काय तुमच्या स्पष्टोक्तीची तारीफ करावी! काय वीणा वाजविला तुम्ही या वेळेला? तुमच्या स्वप्नसृष्टींत सर्व मंडळी अगदीं दृश्य स्वरूपांत माझ्या दृष्टीसमोर खाडकन् उभी राहिली!

**पांडोबाः**—पित्तानें पडलेल्या स्वप्नाचा उगीच गौरव करतां झालें, तुम्ही सगळे!

**कपिलाः**—मी खात्रीनें सांगतें, तुम्ही स्वप्नांतल्या गोष्टीनें देखील वेड लावाल बाई !

**धेनुवल्लभः**—पांड्या, तुझ्यावरून कुरवंडून जाऊं कारे ! हें पहा, तूं आतां अगदीं आमच्याशीं हा खोटा मानमरातब ठेवूं नकोस. आम्ही तुला आमच्यासारखाच योग्यतेचा समजतों ! तूं आतां अगदीं आमच्यांतला आहेस, ये इकडे ये, पांडुरंगा, असा गादीवर बैस !

**गट्टुलाल**—अरे भाई पांडोबा, अठीं आव ! अठीं आव ! बष ! पांडू तो धण्य है ! पाडू तो सुण्णा है ! पांडू तो माणकमोती है !

**पांडोबाः**—छे ! छे ! सरदार ! मी माझी किंमत ओळखून आहे ! असा अपमान कसा करीन गादीचा !

**कोंडिबाः**—पांडोबा म्हनजी नुसता कुरूपचा वस्तरा हाय ! अक्शी बिनपान्यानं शाप ! अक्शी निर्माळ !

**वराहशास्त्रीः**—पांडोबा म्हणजे, पुन्हा मंथन करून काढलेलें पंधरावें रत्न आहे ! तुम्ही आतां आमच्यांत गादीवर बसून मिसळाच !

**धेनुवल्लभः**—चंद्राजी अजून कां बरं आल्या नाहींत ! गंगे, जरा जाऊन सांग बरें तिला निरोप.

**धोंडोपंतः**—जा सांग जा, म्हणावें, सगळेजण वाट पहात बसले आहेत. सरंजाम, हत्यारेंपात्यारें जरी नसलीं, तरी इथें सर्व सरंजाम आहे, हत्यारेंपात्यारें आहेत, अगदीं धांवत ये म्हणावें !

**धेनुवल्लभः**—आज आपण सर्वजण जमल्यामुळें माझा हर्ष गगनांत मावेनासा झाला आहे. पांडोबा, धोंडोपंत, जा ! जा ! सर्व सामान घेऊन या ! शेखहुसेन, तुम्ह्याकडे नुसतें सोडा व्हिस्कीचें काम अं ! जा !

**गंगूः**—सरदार ! चंद्रीच्याकडला अतांच सार्जिदा बाहीर भ्येटला. चंद्री म्हनतीया रुस्तुमजी थापाडिया, लंबेअली, मुडदेअली, अन् तो अगदूगुरु वकील, हथं येऊनशान् सारा धिंगाना घातलाया, कुठं हालूं बी देत न्हाइत. गाऊनशान् नरडं अन् वाजवूनशान् डग्गा दोनीबी फुटलया ! आतां येत नाहीं म्हनतीया.

**धेनुवल्लभः**—ठीक आहे, मरूंदे त्या रांडेला घरींच! तूं जा शेखहुसेनच्या हाताखालीं.

[ शेख सोडा व्हिस्कीचे ग्लासेस ठेवतो इतक्यांत डॉक्टर बडबडत येतात. ]

**डॉक्टरः**—पाजी हरामखोर! ये म्हणावें, मी ऑरग्युमेंटनें सिद्ध करून दाखवतों (सर्वजण समजावितात) म्हणे दगडूशेट मेला. मरेल कसा? ये म्हणावें, मी ऑरग्युमेंटनें सिद्ध करून दाखवितों! मरणें शक्यच नाहीं! म्हणे त्याला ब्युबोनिक प्लेग झाला, होईल कसा? ठेंच लागून बिबो येतो! खाकमांजरींत बिबो येतो! गनोरियांत बिबो येतो! खरचटल्यानं बिबो येतो! गळवें हीं बिबोच आहेत! मरेल कसा! ये म्हणावें, मी सिद्ध करून देतों!

**वराहशास्त्रीः**—डॉक्टर जाऊं द्या! अहो! पण तो धडधडीत मेला, आतां काय कपाळ करतां सिद्ध! हें पहा, मी तुम्हांला विचारतों—

**डॉक्टरः**—काय काय विचारतां? गो ऑन. कोणता विषय?

**चीफ ऑफिसरः**—जाऊंद्या डॉक्टर, हें पहा मी सांगतों तें ऐका. तुमच्या अकलेची का आम्हांला शंका आहे! मरूंदे मेला तर दगडूशेट, तुम्हीं त्यांची गोष्ट नाहीं ऐकली—

**डॉक्टरः**—काय, काय, सांगतां? असे इकडे या. या कानांत सांगा! केवळ मेडिकल विषयाकरितां, आणि कोकिलेकरितां, हा कान राखून ठेवला आहे.

**चीफ ऑफिसरः**--याला म्हणावें प्रेम! हें पहा डॉक्टर, तुम्ही म्हणालां तेंच खरें. दगडूशेट मेला नाहीं! मुनसिपालिटींतला चाळीस हजारांचा खोटा चेक उपटून पैसे लांबविल्याचें उघडकीस आल्यामुळें त्यानें जीव दिला. मेला नाहीं!

**कपिलाः**—हें पहा बाई, बसायचं सगळयांनीं इकडे असं, आणि हा समारंभ साजरा करायचा!

**वराहशास्त्रीः**—हें पहा, आतां अपील नाहीं.

[ सर्वजण बसतात, शेख, गंगू, सोडा–दारू पाजतात, सर्व पितात, ]

**कोंडिबाः**--कशाला त्योकानं जीव दिला पैशापाई! दावा मला, अशी कोणती मुनसिपालिटी हाय, कीं जिथं मेंबरलोक पैका दाबत न्हाइती?

**गट्टुलाल**:—हं ! हं ! येतो चळणेवाळा. उशमे क्या बडी बात है. इलेक्शणका पैसा नहीं तो कैसा लाणा ! साला इलेक्शणकेबदलें आज महिणाभर लोगोकूं शिरापुरी खिला रहाहूं !

**डॉक्टर**:—चालायचेंच ! चालायचेंच ! गांवोंगांवीं महारवाडा आहेच. कसें काय रायबहादुर ! तुम्हीं तर अगदीं चीत मारलेंत बुवा ! काय कोंडिबा, तुम्हीं तर मत कॅन्व्हॉस करायचा धुमधडाका लावला आहे !

**कोंडिबा**:—काई इचारूं नका ! सुरवातीला पांच हजार ठार झालेत ! घेऊंया पुढें मागं काढून ! सोडतों थोडंच ! कां हंसतां शास्त्रीबुवा ! बगा आवंदा आमी बामनास चीत मारतोया बगा !

**कपिला**:—हें पहा बाई, असं हमरीतुमरीवर येऊन जातिद्वेष वाढवून घ्यायचं कांहीं कारण नाहीं. सगळ्या बाळगोपाळांनीं मिळून गुण्यागोविंदानं हा मुनिसिपालिटीचा संसार चालवावा झालं ! ( सर्वजण 'बस् अपील नाहीं' म्हणतात.)

**वराहशास्त्री**:—आतां अपील नाहीं ! उचला सगळ्यांनीं ! हं ! डॉक्टर कोंडिबा, अहो ठोंबे, लागा एकदम संसाराला ! ( दारू पितात.)

**धेनुवल्लभ**:—हें पहा, उद्यां सुरूं होणाऱ्या इलेक्शनची मुळीं इथें वाटाघाट नको ! घ्या ! घ्या ! गंगीच्या आग्रहाकरितां. घाल, घाल, आणखी थोडी गंगे घाल !

**शेखहुसेन**:—पिलाव ! खूब पिलाव ! आपने बापका क्या जाता है ? होनेदे टेर ! होजानेदे ! ( दर ग्लास भरून देतांना थोडी पितो आणि तिला पाजतो.)

**गंगू**:—अन् घ्या की थोडी शेटसाब !

**गट्टुलाल**:—आँ. आँ. आँ. गंगू नहीं होणा, नहीं होणा, बश्, बश् !

**गंगू**:—अन् कोंडिबा तुम्हासनी काय रोग झालाया ! मला ठाव हाय ! घरीं घेन्यापक्षीं, असं फुकटांतच दाबून घ्यावं ! हतं नाहीं थट्टा करायची ! नाहींतर त्या दिवसावानी कराल !

**चीफ ऑफिसर**:—गंगे घाल, घाल, काय ऐकतेस त्या कोंड्याचें. हात धरून घाल, तुमचें, सरदार दाबून चालूं द्या काम ! आज चंद्रीच्या ऐवजीं

गंगे, तूंच एक ठणकाव! एक चांगलेंसें गाणें होऊं दे. (सर्वजण आग्रह करतात.) तें कांहीं नाहीं, सकाळीं गुणगुणतांना तुला स्वतः ऐकलें आहे!

**गंगूः**—सरकार, मी नव्ह–ती अंबी! [अंबू प्रवेश करते.

**प्रो० ठोंबेः**—नेव्हर माइंड! एनी पोर्ट इन दी स्टार्म! चल, अंबे! होऊन् दे तुझ्या अंबराईंतलें एक कोकिळेसारखें गोड गाणें!

**शेखहुसेनः**—क्या देखती है! होनेदे दौलतजादा! अरे, वो पांडोबामे तू लिखवा लाई है वोहि दबादे! क्यों डरती है. देख अंबू! हमकू एक गधा चालीस तोले सोना देगया, ह्या तों इतने गधे है की एकदम् तेरे नसीबका चक्कर फिरजायगा! [सर्व आग्रह करतात.

**अंबूः**—पांडोबानं उद्यांच्या मुनसिपालिटीच्या इलक्शनवर लावनी केलीया! पन् बाई, हथं म्हणूनशान् कोनाला येडंवाकडं लागलं तर, गरिबाच्या पोटावर पाय यायचा पगा!

**कपिलाः**-अगबाई, पांडोबांनीं का लिहून दिली? मग ऐकायचीच गडे.

**कोंडिबाः**—असूं दे ग एडंवांकडं, हथं कोणासनी लागतया न् हाय कुनाला सुद आतां! अंगे! म्हन बिगी, बिगी, हं! कसंकसं?

**धोंडोपंतः**—आहे कोणता लेकाचा शुद्धीवर इथें!

**धेनुवल्लभः**—तें कांहीं नाहीं, एकदम सुरू कर. अगदीं ॲक्टिंगसहित उडाला पाहिजे बार!

**गट्टुलालः**—अंबू इशी, इशी, हात पाय हिल्वाकर! अरे हो जाणे दे!

**अंबूः**—आतां म्हनतांच तर गरिब्राचा नाविलाज हाय!

[सगळे सरसावून बसतात.

### पद

**व्होटासाठीं, झालीं गांवामधें दाटी॥ झिंमड मोठी हो पोटासाठीं झाली॥ धृ०॥ काय सांगू करती लटपटी॥ मिळविती होट खोटींनाटीं॥ हेलपाटे घालुनि लाळ घोटी॥ तिन वर्साची ही तुपरोटी, बांधिती गांठी॥ १॥**

**अन्नावारी किती मॅजिस्ट्रेटी रावबहादुरांचीं धेंडं मोठीं ॥ पेस्तमजी, रुस्तुमजी जमशेटी ॥ शिंपी, सोनार, साळी, कोष्टी ॥ धावधावुनि कुत्रीं भांडती, हो हडकासाठीं ॥ २ ॥ इंदु, सिंधु, चिंगू मास्तरणी ॥ रंगू, चंद्रा, अंबिका सुईणी ॥ नाकीं घालुनी चमकी मोरणी ॥ थोडं हांसुनि मुरका हानी ॥ नेसल्या पातळ जरीकाठी, मतासाठीं ॥ ३ ॥ टांगे-वाल्यांची आली वरणी ॥ मोटारींची करिती मनधरणी ॥ आठरापगड जाती जमुनी ॥ एकमेकाशीं शिव्यागाळी करुनी ॥ झाली भंगीचांभार सगळ्यांची हो लठ्ठालठ्ठी ॥४॥**

**शेखहुसेनः**—अरे अंबू! तूं तो गजब करदी, मारडाली! यार मारडाली!

**अंबूः**—माझं गरिबाचं येडंवांकडं लागलं असलं, तर पोटांत घाला!

**कोंडिबाः**—तूं कशापाई भितेस! मी घालतों पोटांत! मी घालतों पोटात! गट्टुलाल तूं पण घाल पोटांत! शास्त्रीबुवा, तुम्हीबी घाला पोटांत!

**शेखहुसेनः**—दबाव! और दबाव! दो बाटल!

**चीफ ऑफिसरः**—घाल, घाल, अं गंगे, अंबे, आणखी एक म्हण सावकाराची!

**गंगूः**—अरे हुसन्या, दारू संपली कीं समदी! आतां काय घालूं?

**शेखहुसेनः**—क्या घालुं घालुं करती है! अंदर घासलेटका डबा भरा हुवा है! दो बॉटल घासलेटही पिलादे इनको! इस बखत सब चलताहै! चलादे! दबा देव!

**चीफ ऑफिसरः**—घाल, त्या मारवाड्याच्या शेंडींत घाल! म्हण, ती गहुंहरबऱ्याची लावणी म्हण, [ सर्वजण राकेल पिऊन आग्रह चालवतात.

**शेखहुसेनः**—दबादे, डरना नहीं! गजबके हैवान है!

**अंबूः**—आतां काय म्हणूं तरी!

**कोंडिबाः**—शास्त्रीबुवा! माझं समदं हायनाहो जाग्यावर? तुमचं हायना! का नाय? अंबे! आज तुझा चेहरा बघून लई चढलीया बघ दारू! म्हन,

गहूंहरबऱ्याची म्हन! [सर्वजण 'राधागवळण गहूंहरबरा, राधागवळण गहूंहरबरा' म्हणतात.]

**धोंडोपंतः**—पांडोबा! आतां उचला यांना, हे आले आहेत एकेक ठराव बाहेर काढण्याच्या रंगांत!

---

## प्रवेश तिसरा

[**स्थळः**—इलेक्शनच्या मंडपाचा रस्ता.]

**कोकिलाः**—बरं म्हणावं बैला! माझं प्रेम असं लाथाडलंस का? तुझ्या नाकांत वेसण घालून जर न बिनभाड्याच्या घरांत पोंचवीन तर नांवाची ही कोकिलाच नव्हे. काल मेल्यानं मला घरीं बोलावलं होतं पदवी-दानाच्या उत्सवाला! येतें बरं त्या टवळीचा—कपिलेचा—डामडौल आणि शृंगार पाहायला! आतांशें मेली चार यत्ता शिकलेली ती नटवी, काय तोरा करती आहे! नटती आहे! मुरडती आहे! तिला ह्या बैलोबामुळं अगदीं आकाश ठेंगणं झाल्यासारखं वाटतं आहे! बरं म्हणावं! मला दुखवली आहेस, लक्षांत ठेव! अंबे, अंबे! राहूं दे तें झाडणंझुडणं! ये इकडे अशी, काय ग. मग ते तयार आहेत ना?

**अंबूः**—अक्षी तुम्हापाई जीव द्याया तयार हायती. आन् असं कसं म्हनता? पन आमची आपली अडानी जात, त्ये म्हनत्यात, पांच विसा रुपये अगुदर हातांत पाहिजेत, आन् काम झाल्यावर पन्नास पन्नास! मंग काम माझ्याकडे लागलं. अशी जिवासनी जीव देत्याल!

**कोकिलाः**—हे घे! ज्यांचे त्यांना देऊन तिकडे घेऊन ये म्हणजे मी सांगेन समजावून. जा पळ लवकर, हें घे तुला बक्षीस. (ती जाते.) ही टवळी कपिला आमच्या मुनसिपालिटींत शिरल्यापासून, माझं कसं तें वजन राहिलं नाहीं! नाहींतर माझ्याकडे म्हणजे कधीं मेंबर चाहाला, मन-धरणी करायला नाहीं, असा एक दिवस गेला नाहीं; कोणच्या ना कोणच्या निमित्तांनीं शेंपन्नास रुपये घरीं आले नाहींत, असं झालं नाहीं. आतां कशाला माझी मेल्यांना गरज उरली आहे? ती आहे ना सटवी!

धरे! अर ना सगळ्यांचे दांत घशांत घालीन, तर नांवाची ही सुइणच मव्हे! जाईना ही अंबी बळी गेली तर ह्या कामाकरितां! चला, आधीं जाऊन व्यवस्था केली पाहिजे. [ शेख व गंगू प्रवेश करतात.

शेखहुसेनः—

गझल

**सुनो मेरे भाई! कमेटीका गाना। हरामीसे मोफतका खाना पिना ॥ ध्रु० ॥ कंदिल लगाना ॥ सफाई करवाना ॥ पानी छिनकाना। झाडू दिलांना मेंबरोका दिलखुश बयाना! ॥ १ ॥ मालोंके खरेदिमे ये कमिशन उडाते है। नाना, चाच या सुसरेकु कंत्राट देते है ॥ स्टोअरका माल कंडक करके लीलांम करते है। सालेके हात खरीद लेके बंगला उठाते है ॥ २ ॥ बाजारके आम तरकारी ये खूब चरते हैं। लैसनके जोरसे दूधमलाई हजम करते है ॥ होटेलवाले पानवाले गुलाम होते है ॥ पेटकेलिये कदमो पर सिर झुकाते है ॥ ३ ॥ लाईन लगाके घरकु ये बरबाद करते है। टाऊन प्लानिंगमे गांवका कबर-स्तान करते है ॥ महेसूल खाके लोगोंका पेट फुलते है। माले मुफत दिलबेरहम इनके होते है ॥ ४ ॥ आंखें मिलाके कंचनिसे पान खाते है। गांवके बगीचेका फूल गले चढाते है ॥ मोफत मिला तो जम जपके रंग उडाते है। पहिचानका कोई टपक पडा तो संदूकमे छुपते है ॥ ५ ॥ गोरगरीब देखके उसे डराते है। जोरावर कोई नजर पडा तो दुमदबाते है ॥ साहेब नाम सुनते ही होश उडते है। दे भाग घरकु पैजामा धोती बदलते है ॥ ६ ॥**

कोन गगूजान! अरे वारे बुलबुल! क्यौ आज तेरे चेहेरेका चांद घुंगटके बादलसे क्यौ लुपा रही है! क्यारी? तबियत बेमार है? फिर इतना कायकू, पीतीथी कल दबाके! आव, मै तेरा हातपांव दबा देतां हूं! क्या

साली कल तेरे आंबीने मजा उडाई! बस् बस् बस् गजब करदी! इस गांवमें कंचनी तंबोरेलंबोरे सारंगीसुरंगी, खींच खींचवाकर बागडबिल्लके तऱ्हे उचकउचक कर चिल्लाती है, लेकिन मै कसम खा कर कहता हूं, के एक मेरी मुनसिपालिटीकी गरीब झाडूवाली ये सब रंडीयांपर झाड़ फेर देइंगी!

**गंगूः**—आन् लई चतुराई ग'तुसया! आन् समदा कालचा पैका आन्!

**शेखहुसेनः**—अरे प्यारी लीलमपरी, ये सालिम के सालीम शेख तेरा है! पैसेकू क्या करती है!

**गंगूः**—तुझी कायी भाजी करू व्हय?

**शेखहुसेनः**—बुलबुल तेरेपर ये बंदे गुलामकी जान कुर्बान है! भाजी करले, बिरयानी करले, खीमा करले! जो दिल चाहे सो करले! चल प्यारी! अभी सब लोगां इधरसेही मंडपमें जायेंगे! चल! अभी शुरु हो जायेंगे! चल आगे, बंदोबस्तके लिये मेरेकू जाने दे.

**गंगूः**—व्हय्! व्हय्! तूं हो म्होरं! ह्यो बघ गट्टुलाल मारवाड्याची वरात हकडच येतीया! [ जातात.

( आंत ' गट्टुलालकी जय ! ' असा ओरडा होतो. चंद्रा नायकीण, तबलजी, सारंगीवाले, ठुमरी गाऊन चंद्राजी नाचत येते. पायघड्यांवरून लग्नाला सजलेला गट्टुलाल मळवट भरलेला मिरवतो. यांचे मागं मारवाडणी गात जातात. ]

**पद**

**चंद्राः**—

**मेरे गट्टुलालकु तुम व्होट देनाजी व्होट देनाजी, धम देनाजी ॥ धृ० ॥ गलेमें मोतीं, कानोमें कुंडल, बालोंमे लालडी, गुंदलायेजी ॥ १ ॥ मुंडी मरोडकर बंगला बंधवाकर, हरामीसे पेटकू बढायेजी ॥ २ ॥ मारवाडसे चिठ्ठी आयी बिटवा भयो है ॥ गट्टुलालजी ब्रह्मन जिमायेजी ॥ ३ ॥**

**गट्टुलाल**:—जीते रहो! जीते रहो! मेरे प्राण चंद्राजी! ये षब मुगषीग्राटली तुमपर कुरबान है! अरे भाई, खटमलजी, कांई बोल्या! अरे प्राण चंद्राजी!

### दोहा

**कमळ बदणका भंवर बणाहूं। थारे मिरगा नयणी।**
**चूषण दे रष गट्टूलालको, चंद्रावदन कंचीणी ॥ ध्रु० ॥**
**तूं चंपा जूं खील रहो है, जिवडो गयो लुभाय।**
**कांई बोल्या! रूपशोभा मुखसे कही न जाय ॥ १ ॥**
**रूप बागमां, थारि लगी हय निंबू आंब अनार।**
**जुई मोगरा, गुलाब चमेली, फूली अपरंपार ॥ २ ॥**
**मणमां लागे तुझे बणादूं सुंदर शेटाणी।**
**कूण बातकी कमती घरमां हूं राजा तूं राणी ॥ ३ ॥**
**खडीमांतो माटि मिलावूं, घासलेटमां पाणी।**
**चूणामां तो राख ढकेलूं करदूं आबादाणी ॥ ४ ॥**
**घीडब्बोमां चरबि घुसेडूं गहुं आटांमां भूंस।**
**मूंषिबाटलिके घरमां लागी मारवाडकी घूस ॥ ५ ॥**
**प्रेसिडंटकूं बगल दबादूं चीप अफसरकू लाथ।**
**रंग देखकर ढंग बदलदूं हुशिआरी के साथ ॥ ६ ॥**

घणी खम्मा! घणी खम्मा! चंद्राची! अरे भाई, खटमलजी! ओ गुदमलजी! ये तबलेवाला, ओर सारंगीवाला भी खूप करामत कियो है! ओ बाळाजी! ओ डाकुरजी! आज म्हारे इरेक्षण जें जष देणा!

**तबलेवाला**:—शेठसाहेब! आपकेविगर बंदेकी करामत जाननेवाला भी कोन है! आज आपके इरपशनके वास्ते तबलेमें बोल भी बिटा दिया हूं! देखिये जनाब! 'तुम्, शेट, जी, कूं, मत, देन्ना, तुम व्होट देन्ना, तुम मत देन्ना, शेटजीकुं देन्ना. शिरापुरी खां, शिरापुरी खां! शिरापुरी खां!

**गट्टुलालः**—बष, बष, बष, भाई! तबलजी तुम तो कमाल कियो है! चालो, लोगण चालो, जलदी जलदी चालो! महिणा भरकी शिरापुरी खांके भग जावेंगे, इषीवास्ते दुपट्टेसे गांठ मारकर लाया हूं! चालो भाई! एषा न होवे के मारो इरक्षण अठी के अठी ठंडा होवे! चालो, आज मिहिणाभरकी शिरापुरी ख्याल रखणा.

**खटमलजीः**—लालाजी, बेगुमाण रहणा. बोलो भाई, 'रामनाम मिथ्या है, शिरापुरी सत्य है.'

[ त्यांच्या मागून मारवाडणी गाणें म्हणत जातात.

**मारवाडणी —म्हारा राणाजी, चाल्यो है गामविलक्षणकू ॥**
**नवलभयो हे लुगाइ लोगणकू ॥** [ जातात.

**वराहशास्त्रीः**—( प्रवेश करून ) आहे काय जुलूम? लोक आपले माझ्या नांवानें बाजा करताहेत! आणि मीही माझ्याकडून लोकांची मर्जी संपादन करण्याकरितां प्राण सोडतों आहे. सत्याग्रह करा! खारका खाऊन सत्याग्रह करतों आहे! असहकारिता पुकारा! घरांत कडी लावून प्राण सोडतो आहे! खादी वापरा! नखशिखांत पासोड्यामारुती बनलों आहे! फंड काढा! गुंडांत फंड सांठवतो आहे! प्रतियोगी सहकारिता पुकारा! पायां पडतों, शिव्या देतों! पायां पडतों, शिव्या देतों! कौन्सिलांत शिरा! कौन्सिलांत शिरतों आहें! रात्रंदिवस, 'घटंभिन्द्यात पटं छिन्द्यात् कुर्यात् रासभस्वरं' तरी देखील हे बेइमान लोक मला प्रसिद्ध पुरुष समजून आपलीं मतें देत नाहींत. काय तर म्हणे माझ्या भाचाला मुनसिपल शाळेंत सुपरिंटेंडेंत नेमला! माझें एवढेंसें कुसळ देखील खुपूं लागतें, आणि दुसऱ्याचें तेवढें चालतें! तो चिचुंद्रीकर! त्याच्या घराच्या मागचीं लोकांचीं घरें शाळेकरितां मुनसिपालिटीकडून घेऊन आतां जागा घाण ठरवून खाजगी बागेकरितां आपण स्वतः थोड्या भाड्यानें उपटतो! तो मोतीवाला! घरासमोरचें फायर एंजिन काढून, आपला तबेला करतो आहे! तो नकटा! अकौंटंटला तंबी देऊन अधिकारांत फुकटचे पैसे वापरतो आहे! तो दाढीवाला! जटावाला! घरापुढची मोकळी मुनसिपालिटीची जागा फुकटांत वापरावी

म्हणून मारुति बसवतो आहे! आणि गंमत पहा! मुनसिपालिटीनें आणि लोकांनीं बोलूं नये म्हणून त्याला लोकमान्य मारुती म्हणतो आहे! हें सगळें पचतें आहे, आणि माझ्या भाचाचें तेवढें पोटांत ढवळत आहे! जाऊं या झाले! (धोंडोपंत प्रवेश करतो.) बरें झालें! काय धोंडोपंत, मग ती मालकीण होते आहे का कबूल? कां मारती आहे नुसती थापा?

**धोंडोपंतः**—तुम्ही तिच्यावर विश्वास टाकूं नका! तिच्याबद्दल गांवांत फार ओरडा आहे. प्रत्येकजण मला असेंच म्हणतो आहे, कीं ती मलाच देणार म्हणून! आतां बॅलटिंगनें व्होटिंग आहे, ती हळूच जाऊन कुणाला देऊन येईल मत, काय सांगावे!

**वराहशास्त्रीः**—बरें मरूं दे तिला! तुमचें कसें काय? तुम्हीही गुंगाराच देणार?

**धोंडोपंतः**—मी माझी मतें द्यायला केव्हांही कबूल आहे, पण डॉक्टर सारखा मागें लागला आहे, त्याला काय करूं?

**वराहशास्त्रीः**—मरा तुम्ही सगळे! जें काय होईल तें होईल! चला तर! चला इथून तोंड काळें करा!

**धोंडोपंतः**—अहो, पण माझ्या गरिबावर कां रागवतां—माझ्या गरिबावर कां रागावतां? (जातात. **बक्करखां** प्रवेश करतो. व त्याचे समोरून **खंडू धोबी** जातो.)

**बक्करखांः**—कौन साला हमारे बिगर दुसरेकू ऊंठ देता है, सो देखता हूं! ये करेलेके एक सपाटेसे खोपडी और भेजा अलग कर देऊं गा! ए साले धोबी, किधर चला है! इधर आ! तेरी ऐसीतैसी! इधर आ! क्यारे, तूं व्होट किसकू देएंगा?

**खंडू धोबीः**—किसकू देएंगा म्हंजी? मीच उभा हाय ना इलक्शणला! मीच उमेदवार उभा हाय!

**बक्करखांः**—(वेडावून) मीच उभा है! हम क्या साले बैठे हैं! हरामजादे! मुनसिपालटींमें धोबीका क्या काम है?

**खंडू धोबीः**—(स्वगत) मंग ल्येका, पयलूवानाचं तरी काय काम हये? पन इचारावं कसं? कारल्यानं कंबरडं शाफ करायचां!

**बक्करखां**:—साले अंड् संड् क्या बात कर रहा है? क्या रे धोबी, मुनसिपालटीके मेंबरलोगोंने क्या जमालगोटेका सुल्लाब लिया है? जो तू उनके कपडे धोनेके वास्ते भाग रहा है!

**खंडू धोबी**:—(स्वगत) अर इच्या! मंग तूं तरी ल्येका, त्यांचं काय आंग ठनकतया म्हून रगडाया निगालास व्हय? पन इचारावं कसं? हातांत याच्या येताळ हायना!

**बक्करखां**:—बकवा बंद कर! बेइमान साला! क्यारे लौंडे! तेरे पीछे कुई चमार भी आ रहे है?

**खंडू धोबी**:—चमार? त्ये तर आतां तुमच्या म्होरंच गेल! त्ये बी समदे उभे हायेत माज्या संगच!

**बक्करखां**:—(वेडावून) उभ्भे है, उभ्भे है! बेशरम साला! तुम सब उभ्ये है तो यार क्या बैठे है? ठहरो! अब तुम सब लोगोंकू बिठाकर और सुलाकर यारही अकेले खडे रहानेवाले! ला इधर सब कपडे!

[बोचकें हिसकतो.

**खंडू धोबी**:—अरे, अरे! लोकांचे हैत, लोकांचे हैत!—

**बक्करखां**:—लोकांचे हैत तो लोगोंकूही बांठ देतां हूं! बंदरके माफक तो सुरत है और कहता है के उमेदवार हूं! तूं उमेदवार है तो यार क्या मुर्दा है! बेशरम साला! मेरेकू कहता है, उभ्भा है! अच्छा तो, भाग साले घरकू, सो जा! याद रखना बेटा, फिरके उभ्भा रहा, तो ये करेले शरीफके एक सपाटेसे सुलाई देऊंगा. फिर उठनेका टंटाही मिट जायगा. चलो. यारके आखाडेके सब पेहेलवान् लोगोंकू और चेलोंकू बाट देएंगे!

[शिंदेशाई पगडी घातलेला, सजलेला **कोंडिबा** न्हावी मुंडावळीसकट प्रवेश करतो.]

**सर्व न्हावी**:—**स्थानिक राज्याचा मेळा। व्होट करूं या गोळा॥**
**स्थानिक लोन्याचा गोळा। गट्ट करूं या सगळा॥**

[नंतर दंगल करतात. 'व्होट द्या, मत द्या' म्हणून एकमेकांच्या खांद्यावर उड्या मारतात.]

**कोंडिबाः**—चलार गड्यांनों बिगिबिगि ! लिवनंपुसनं शिकूनशान ह्ये दुसर लोक आमासनी लई आडावत्यात. औंदा हा कोडिबा समद्यानी चीत मारतुया बगा. लई पारशास्नी, बामनास्नी, समद्यास्नी ग्यानाची घमेंड हाय ! कायहो जोतिबा, मुनसिपालिटींत व्होवं कशाला लिवनन् पुसनं ?

**जोतिबाः**—रस्ता झाडायान् केर टाकाया व्होवं कशाला ग्यान ?

**कोंडिबाः**—हां हिंग अस्सं ! खरंच बगा जोतिबा !

## पद

**न्हावी तेली परीट चांभार सुतार सोनार । रावभादर शेट सावकार । महार मराठ भंगी नोडग समद् झुकनार । औंदा निवडुन मेंबर होनार ॥ध्रु०॥ काय बिशाद है मंग कामाची । खिनांत करनार । खेड्याचं दिल्ली शहर ॥ धदेवाले अम्ही मर्द गडि नाहीं जाणार । कुणाच्या काकाला हार ॥ १ ॥ नगर-कामिन्या डागडागिन्यानं सजविल सोनार । धुत्याल कपड परीट, बांधिल सुतार घरंदारं ॥ २ ॥ घाना लाविल तेली, शिवत्याल जोड चांभार । शिक्शान् शिक्शान् म्हणुन् मांगत्याल भीक प्रोफेश्वर ! ॥ गड्यार फिरून घरोघर ॥३॥**

समद्या बामनांचा म्हणजे खुळचटांचा बाजार हाय झालं ! चलार, बिगिबिगि, ए गेन्या, ए सांवळ्या, ए म्हाद्या, चलार समद ! योक महिना हजामत फुकाट ! मलाच भरार मतं तुमचीं ! काल रातभर भाड्यानं घेतलेल्या घरामंदी सवाशें मानुस बेवडा पाजुनशान् कोंडुन घातलंया ! त्याची निशा उतरायच्या आंतमंदी, त्येसनी मोटारींत घालून, तथ नेऊन व्होटचा कागद पेटीमंदी कोंबून घेतला पाहिजे बगा ! चलार, महिनाभर हजामत फुकाट !

[ तेंच गाणें म्हणत जातात.

[ मुलांचा मेळा. **पांडोबा, प्रो० ठोंबे, डॉक्टर, कोकिला** वगैरे प्रवेश करतात. ]

**पद**

**चला रे मत द्याया जाऊं। जबरिनें मत द्याया जाऊं॥**
**मेंढीमागें मेंढि पळतसे तसे अम्ही धावूं ॥ १ ॥**
**विद्यागुण न मुळीं पाहूं ॥ न्हावी तेली परिट भंगि जरि**
**मत त्यासी देऊं ॥२॥ केवळ अम्ही भोजनभाऊ ॥ नवरा-**
**नवरी मरो, जळो घर, पिंड अम्ही खाऊं ॥ ३ ॥**

बोला ! हिंदुमुसलमानकी जय ! परीटचांभारकी जय ! महारमराठाकी जय ! ब्राह्मणयुरोपियनकी जय ! वसुधैवकुटुंबकी जय !

**डॉक्टरः**—( आग्रहानें सर्वांस पुढें घालून ) आमच्या इलेक्शनकरिता तुम्हांला त्रास पडतो आहे.

**कोकिलाः**—ओ, नेव्हर माईंड ! एकमेकांच्याकरितां जर त्रास घेतला नाहीं तर जगाचा गाडा कसा चालू रहाणार ! ( स्वगत ) बरं, पाहतें अं, कपिले, आतां तुझ्या गमजा ! सोयीनें घेतली तर गाईसारखी सुईण; पण दुखवली म्हणजे वाघीण होते, हें ठाऊक नाहीं तुला !

[ जाते; **धोंडोपंत** येतात.

**डॉक्टरः**—चला ! नाहींतर मतदार जातील निघून सगळे !

**प्रो० ठोंबेः**—त्याची कांहीं काळजी नको. सगळ्या मतदारांना असा तोबरा दिला आहे, कीं त्यांचे पायच हलणार नाहींत जाग्यावरून !

[ **डॉक्टर व ठोंबे** जातात.

**धोंडोपंतः**—अहो, इथें काय करतां ? तिकडे मांडवामध्यें नुसता तुमच्या नांवानें शंख सुरू आहे ! चला, चला ! त्या चीफ ऑफिसरचा घसा कोरडा झाला ! तुम्ही इथें काय करतां ?

**पांडोबाः**—धोंडोपंत, गंमत पहातों आहे ! आतां अगदीं रंग भरला आहे ! आतां ह्या तुमच्यापुढेंच, लग्नमुंजीच्या अक्षती-वराती पाहून नुसता

थक्क झालों बोवा! धोंडोपंत, आज तुमचे डॉक्टर आणि कोकिला तर अगदीं रंगांत दिसले!

**धोंडोपंतः**—आमचा डॉक्टर म्हणजे काय विचारतां, गोलंदाज डॉक्टर! गोळीबार चुकायचा नाहीं! त्याची गोळी खाणें आणि बंदुकीची गोळी एकच! अगदीं रामबाण! डॉक्टर—कोकिलेची ही गोलंदाज तिरंदाजांची दुक्कल एकाद्याच्या घरांत शिरली म्हणजे रोगी तर लंबे होतोच, पण आसपासचे शेजारी, नातलग वगैरेसुद्धां तिरंदाज जखमी करून येतो!

**पांडोबाः**—या इन्फ्ल्युएंझापासून पिकली खरेंच लेकांची पोळी! ज्या धोंड्याला हुंगून कुत्रें देखील समाचार घ्यायचें नाहीं, अशा सगळ्या धोंड्यांना आतां शेंदुर लावला गेला खराच!

**धोंडोपंतः**—तुम्ही आतां पर्यायानें आमचीच शोभा आरंभिलीत! चला! मी जातों पुढें. या कुठे आहेत त्या किल्ल्या! चला बरें का. मागोमाग! [ जातो ]

**पांडोबाः**—चला, आलोंच. भरा सगळे त्या मांडवांत! आग का लागेना त्या मांडवाला! काय काळ आला आहे बोवा! नुसता काळ नाहीं, अगदीं विकाळ काळ आला आहे!

**पद**

**आला रे काळ देवा जगीं उफराटा ॥ ध्रु० ॥ व्होटा देउनि लोक निवडती शिफारशी तट्टा। भिडेभिडेनें अम्ही लावितों हिंददेशिं वट्टा ॥ १ ॥ ओ-ची ज्याला ठोहि कळेना पंडित तो मोठा। ऐसे ढोंबे मिळुनि फिरविती ग्रामीं वरवंटा ॥ २ ॥ करवसुली करि कोल्हा, शिक्षण अजापुत्र हाता। कोठीवर नेमिला लांडगा। आरोग्या उंटा ॥ ३ ॥ एकंदरिनें सुतारकामा लावियले परिटा ॥ अखिल निरिक्षण करित धूर्त तो जादुगार मोठा ॥ ४ ॥**

नुसते आगगाडी-तारायंत्रानेंच आम्ही दुधखुळे आज दोन पिढ्या अचंब्याने चारीमुंडी चीत होतों; आणि आतां तर पाश्चात्य सुधारणेच्या गारुड्या! विमानें, झेपोलिनें, मशीनगन्स, टँक, वायरलेस, तारायंत्र काढून आमची सात पिढ्यांची निचिंती केलीस! या अचंब्यांतून आम्ही बावळे कसलें डोकें वर काढणार आणि स्वराज्य मिळविणार?—आणि हवें आहे तरी कोणाला इथें? दहा हजार कोसावरून मोहनास्त्र टाकणाऱ्या मांत्रिका! चातुर्यानें आणि भाषालालित्याने शब्दांच्या मालमसाल्यांची मयसभा निर्माण करणाऱ्या मयासुरा! एकांत एक मिसळून तीन सिद्ध करून दाखविणाऱ्या गणितशास्त्रविशारदा! होय-नाहीं, खरें-खोटें, सत्य-मिथ्या, भूत-भविष्य यांचे विरोधी अर्थ दोन्हीही एकाच शब्दांतून निर्माण करून प्रत्यक्ष धडधडीत अनुभव घडवून देणाऱ्या विद्वान् चतुर पंडिता! तुझ्या बलसामर्थ्यापुढे हा दुबळा हिंद तुला शरण आहे! तुझ्या शक्तीला आम्हां हिंदवासीयांच्या अकलेची शरणचिठ्ठी आहे! चला! आज आमच्या कपिलाबाई कोणच्या कामांत गर्क झाल्या आहेत? बहुतेक आमच्या पत्रांतील मजकूर वाचून भडका उडाला असेल! ह्या पहा! आठवण काढतांच हजर! [ **कपिला** येते.

**कपिला**:—( रागानें ) चांगला-चांगला ऐन वेळेस गळा कापलात हो! तुम्ही इतके काळसर्पासारखे विषारी असाल, अशी माझी मुळींच कल्पना नव्हती!

**पांडोबा**:—हें पहा! मला क्षमा करा! मी काळसर्प मुळींच नाहीं. आतांपर्यंत मीं जें कांहीं वर्तन केलें, तें केवळ, तुमच्या प्रेमाच्या आणि शिफारशीच्या जोरावर, ह्या लोकनियुक्त संस्थेच्या अंतरंगांतील कारभार पाहण्याकरितांच केलें. कपिलाबाई, मी काळसर्प नाहीं, आणि तुम्हीही नागिणीचें स्वरूप टाकून द्या. ज्या बिचाऱ्यानें तुमच्याकरितां आपल्या सर्वस्वावर पाणी सोडून तुम्हाला जगांत योग्यतेस आणलें, तुमच्यावर सर्व विश्वास टाकला, त्यालाच तुमच्या खऱ्या खऱ्या प्रेमाचा आहेर करा. त्याच्या कुबेरासारख्या संपत्तीचा, त्याला नीट उपदेश करून, सदुपयोग करा; आणि तुमच्या प्रेमाचें रूपांतर करून या क्षणापासून मला आपला बंधु समजा. हे पहा! सरदार इकडे आलेच!

**कपिला**:—( त्याच्या पायां पडते. ) पांडोबा!

**पद.**

**बंधू हा मला लाभला। सुपथ खरा दाविला ॥ धृ० ॥**
**गूढभाव कळला हृदयाला। मोल नसे प्रेमाला। लोभे**
**ना कांचना ॥ १ ॥ भेद नसे प्रेमा परमेशा। कोण**
**असा दे मोल अमोला। अतुला जो करि तुला ॥ २ ॥**

तुम्ही मला गुरु भेटलांत! वाटेल ती वस्तू पैशानें हस्तगत होते; पण प्रेम ही वस्तू अमोल आहे, हें तुम्ही खरें करून दाखविलें. यांतील एक शब्द मात्र सरदारांच्या कानांवर पडूं देऊं नका, येवढेंच हात जोडून सांगणें या भगिनीचें आहे.

**पांडोबाः**—उठा! हे पहा सरदार आलेच! [ **धेनुवल्लभ** येतो.

**धेनुवल्लभः**—पांड्या, आतां हा असा पोषाख कां केला आहे, सांग पाहूं.

**पांडोबाः**—इलेक्शनच्या मांडवांत प्रेसिडेंटच्या मंदिरावर यांचा कळस चढणार आहे म्हणून!

**धेनुवल्लभः**—तूं धूर्तच आहेस! ठीक आहे. तुम्हीं पुढें जाऊन सर्व बंदोबस्त करा. आतां तुमच्याशीं बोलायचें तें या गडबडींत सर्वांच्या देखत कशाला? निवडणुकींत येऊन माळ गळ्यांत पडतांच श्रीनगरला बंगला घेऊन चार महिने राहूं! मग बोलणेंच बोलणें! चला, तुम्ही मांडवांत असल्याशिवाय इलेक्शनला जोर चढणार नाहीं. (तीं दोघें जातात.) बस्! बस्! प्राणेश्वरा! साहेबबहादुरा! तुझें पदवीदान म्हणजे जीवदान आहे! नाहींतर माझ्या श्रीमंतीला कोण विचारतो? काय राजनीति आहे! काय न्याय आहे! काय कायदा आहे! काय फायदा आहे! काय कौन्सिलें आहेत! काय कमिशन्स आहेत! काय असेंब्लीज् आहेत! बस्! बस्! कमाल आहे! चक्रव्यूह आहे! चला! एकवेळ निवडून येऊन 'कपिला—धेनुवल्लभ' हें नांव गरजलेलें केव्हां या कानांनीं ऐकेन असं मला झालं आहे! [ जातो.

---

## प्रवेश चवथा.

[ **स्थळः**—इलेक्शनचा मांडव. मतदार व इलेक्शनला उभे राहिलेले उमेदवार लोक मतें टाकीत आहेत. उमेदवार आपल्या शिफारसी सांगून त्यांना वळवीत आहेत. कांहींजण आंत मतें न टाकतां धेनुवल्लभास गुपचुप आणून देतात. कांहींजण मतें मारवाडणीस देऊन गिन्न्या घेतात. पांचसात मेंबर्स व्होटर्स वळवण्याकरितां लेक्चरें देतात. दोन वाजतां इलेक्शन बंद होतें म्हणून गर्दी करतात. टेबलावर सोडालेमन-पाण्याचे ग्लासेस, पाणी पीत लेक्चरें देतात ! नानाप्रकारचे व्होटर्स लोक.

**वराहशास्त्रीः**—ऐका फसूं नका ! मी स्वराज्यपक्षातर्फे उमेदवार आहे ! माझा तुमच्यावर हक्क आहे ! मलाच मत द्या ! पेटीचा रंग केशरी ! ध्यानांत ठेवा ! निशाणी पेटीवर वराह अवताराचें चित्र आहे. गुलकंद !

**गट्टुलालः**—भाई, शिरापुरी ख्याल रखणा ! शिरापुरी ख्याल रखणा ! ओंठ देणा गिणी लेवणा ! खुल्लो सवदो है ! पेटीको रंग लाल है ध्याण रखणा ! रसगुल्लो !

**कोंडिबाः**—धावा रं मर्दांनो धावा ! समद्या इद्‌वानासनी भुलूं नका ! पल्याड माझा तंबू आहे ! जाऊन्‌शान्‌ घोटवून घ्या ! दाढीचा एक खुंट राहिला तर मला विचारा ! अकशी शाप, निर्मोळ ! ध्येनांत ठेवा, वरीसभर हजामत फुकाट ! गेन्या घेर त्यासनी, घेर त्यासनी, ऐका मर्दांनो ! गुलाबी पेटीवर वस्ताऱ्याची खून हाय ! इसराल ! सोडाइस्की !

**डॉक्टरः**—मी किती विद्वान् आहे हें महशूर आहेच, ध्यानांत ठेवा निदानींचा मीच तुमच्या उपयोगी पडेन ! मलाच मतें द्या ! पेटीचा रंग पांढरा असून वर थर्मामिटरचें चित्र आहे ! आयस्क्रीम !

**गट्टुलालः**—मेरे दुकानके विक्रीसे मै हिंदुस्थानका राजकारण करताहूं ! घाटो आयो तो देश गरीब है, नफो हुयो तो शेपण्ण है !

खुल्लो खुल्लो है! मत देणा और गिणी लेवणा! रंग लाल है! ध्याण रखणा! रसगुल्लो!

**प्रो० ठोंबे**:--हे सर्व लोक मूर्ख आहेत असें मी म्हणणार नाहीं! हे स्वार्थसाधू आहेत म्हणणार नाहीं! त्यांना राजकीय मतें नाहींत म्हणणार नाहीं! दुसऱ्याची निंदा करणार नाहीं! आत्मस्तुति करणार नाहीं! पेटीचा रंग निळा! श्रीखंड!

**धेनुवल्लभ**:—पांड्या! माझें ठीक चाललें आहे ना?

**पांडोबा**:--काळजी नको. पेटी तोंडातोंड भरली असेल! तुमच्याजवळ कितीं जमलीं आहेत!

**धेनुवल्लभ**:—निदान कमींत कमी दीडशें. तूं तिकडे जा! काय रे अत्तरगुलाबाची तयारी ठेवलीस ना?

**वराहशास्त्री**:—धावा! दहा मिनिटेंच राहिलीं! गुलकंद देतों! मलाच मत द्या!

**डॉक्टर**--ऐका, मी पन्हें करवितों! कोकिलेच्याकडून देववितों!

**कोंडिबा**:—मी इस्की सोडा पाजतों! सर्वजण माझ्या पेटींत घाला.

(आग्रह चालवतात.)

**धोंडोपंत**:—अहो पण, माझें एक मत सगळ्यांच्या पेटींत एकदम कसा टाकूं?

**पांडोबा**:--धोंडोपंत त्यांना सांगा आळीपाळीनें घालीन! आहेच दर तीन वर्षाला या क्षेत्रावर मुंडण!

**वराहशास्त्री**:—कायरे टांगेवाल्या, तूं कुणाला देणार आहेस बाबा? तूं कसला आम्हाला लाभतोस! पहा मतें दिलीस तर एक डबा गुलकंद!

**डॉक्टर**:—अरे, त्यांच्या थापेला भुलूं नकोस! मी तुला कोकेन देतों! अरे मला नाहीं दिलेस तरी चालेल पण त्या नकट्या वकिलाला देऊं नकोस!

**कोंडिबा**:—अरे, त्या नकट्या वकिलाला देण्यापक्षीं पेटींत घाल! वरीसभर दाढी फुकाट!

**गट्टुलाल**:—ओ खटमलजी! उदेपुर जोधपुरपाशी है! मारवाडीसे मारवाडी मिळणा! ओंठ देणा गिणी लेणा! खुल्लो बेपार है! रसगुल्लो!

**बाळासाहेब दुतोंडेः**—अहो माझ्या पेटींत घाला ! अहो असें काय करतां ! मी सभ्यपणाचें सोंग करीत नाहीं ! मी खरोखरीच सभ्य आहे ! आय ॲम् ए जंटलमन् ! निदान माझ्या वडिलांकडे तरी पहा ! बारा वर्षें ज्यांच्या गळ्यांत गळा होता अशा मित्राच्या विरुद्ध प्रसंग येतांच मीं वकीलपत्र घेतलें आहे ! धंदा म्हणजे धंदा ! माझी निस्पृहता लक्षांत ठेवून मलाच करा ! श्रीखंड ! बासुंदी !

**वराहशास्त्रीः**—खोटं आहे ! फसूं नका ! गुलकंद !

**बाळासाहेब दुतोंडेः**—अहो असें काय करतां; मलाच करा. मी वकील आहे. माझा दोन्हीकडून उपयोग करा. खरें खोटें माझ्या हातचा मळ आहे. मी विष्णूचा माकड नि माकडाचा विष्णु करून दाखवितों. वाटेल तें सिद्ध करून दाखवतों. मलाच करा. बासुंदी !

**वराहशास्त्रीः**—मतदारांनो फसूं नका ! हा लोकांच्या खऱ्याखोट्याचें खरकटें खाणारा डोंमकावळा आहे ! हा एकटाच खरकटें न खातां थोडेंसें न्यायाधिशासही भरवतो.

**बाळासाहेब दुतोंडेः**—हो ! हो ! भरवितों. पुराव्याच्या उकिरड्यांत लोळणारा तो देखील एक प्राणीच आहे ! खरकटें खाल्लें म्हणून विटाळतो थोडाच ! ह्या प्राण्याला मत न देतां याच प्राण्याला द्या. बासुंदी !

**डॉक्टरः**—लांडीलबाडीचे कांटे पोटांत घालून ते पचविण्याची शक्ति ह्या एकट्याच प्राण्याला आहे, अशी याला घमेंड आहे. ह्या प्राण्याला मत न देतां ह्याच प्राण्याला मत द्या. आइस्क्रीम ! ( आळीपाळीनें श्रीखंड, गुलकंद, आइस्क्रीम, सोडाइस्की, रसगुल्ला वगैरे ओरडतात. )

**कोकिलाः**—कायग, अगदीं सांगितल्यासारखं केलंना तुझ्या माणसांनीं ?''

**अंबूः**—अक्शी बेमालूम ! काळजी सोडा !

**पोलिंग ऑफिसरः**—गंगू कोम ? ( सर्वजण तिला 'मलाच दे, मलाच दे ' असा आग्रह करतात. ) कायग, नवऱ्याचं नांवं काय ?

**गंगूः**—मला बया लाज वाटते.

**शेखहुसेनः**—अरे क्यंव डरती है ? कहे दे शेखहुसेन ?

**गंगू**—अरे पन तुझ्याशीं निका कुठं लागला-हाय ! माझ्या लगनाच्या नवऱ्याचं नांव व्हय ! अण्णा.

**पांडोबाः**—गंगू कोम अण्णा ? हा कुठला कोमण्णा कामण्णाचा भाऊ ? कायग अण्णा नवऱ्याचं नांव का बापाचं ? तूं तर मला बापाचंच म्हणत होतीस !

**गंगूः**—अहो, नवऱ्याचं म्हून सांगितलं ना ? तुम्ही बी पांडोबा माझ्या गरिबाची थट्टा करतां व्हय ! ( 'मला दे, मला दे,' सर्व आग्रह करतात. ) आतां बया ह्यो यवडंसं मत समद्यासनी तरी कसं द्यायचं ! आतां येइल त्यांच्या येइल वांठ्याला झालं !

**पोलिंग ऑफिसरः**—चला लवकर आटपा. दोन मिनिटांनीं व्होटिंग बंद !

**कोंडिबाः**—धावा र मर्दांनो ! आतां मेल गाडी सुटतीया ! वरीसभर हजामत फुकाट ! सोडा इस्की ! पेठीवर कुरुपच्या वस्ताऱ्याची खुन हाय !

**पोलिंग ऑफिसरः**—चला, पोलिंग बंद. सर्व उमेदवारांनी आपलीं मतें टाकून द्यावींत. ( सर्व मेंबर्स मतें टाकून येतात. धेनुवल्लभ आपलीं मतें पाकिटांत घालून टाकून येतो. )

**धेनुवल्लभः**—हो, म्हणजे पुन्हा सगळीं टाकलीं कीं नाहीं तो मनाला संशय नको. अगदीं सहीशिक्क्यानं टाकून आलों ! पांडोबा, त्यांना सांगा यायला ! आणि तुम्ही अत्तरगुलाब पानसुपारी घ्या वांटायला !

**पोलिंग ऑफिसरः**—पोलिस, पेट्या आण पुढें.

( ते पेट्या आणित असतात. )

**वराहशास्त्रीः**—झाले ! जें मिळायचें नशीबीं होतें तें पेटींत पडलें. आतां मित्रमंडळींनों चुरस कशाला ?

**गड्डुलालः**—अरे भाई, आब चुरस क्या है ? आपण तो सब भाई भाई है !

**कोंडिबाः**—खरं हाय ! अक्शी एका मायच्या लेकरावानी समद वसुनशान् सरदाराचं कौतुक करूं या !

**पोलिंग ऑफिसरः**—( पेट्या पुढें आणून नंबरवारीनें मोजतो. ) सलूनवाले १४००. जगद्गुरु वकील १ कोरें वकीलपत्र ! वराहशास्त्री ८०. ही पुडी कसली ? गड्डुलाल मारवाडी १२५० ! काळभैरवाचे दोन गंडे !

प्रो० ठोंबे ५०! मुडदेअली १३०० व ४ फाटकीं हँडबिलें! धेनुवल्लभ रायबहादुर १५००! एक सीलबंद पाकीट! डॉक्टर बचनाग एक फुटकं थर्मामिटर व चार गमपलासच्या पट्टया! बाळासाहेब दुतोंडे वकील २!

**कोंडिबाः**—अहो पोलिंग ऑफिसर, इतक्यांत कशीं मतें सगळी मोजतां आलीं!

**पोलिंग ऑफिसरः**—अहो, पेट्यांना काउंटर्स लावलेलीं आहेत. अरे, ह्या पेटीला तळकटही नाहीं! आणि ह्या पेटीला तर मत घालायला जागाच ठेवलेली नाहीं! आहे तरी कोणाची ही?

**कोंडिबाः**—असल कोनाची पोराबिराची खेळांतली! नाहींतर एखाद्या खुळचटाची!

**प्रो० ठोंबेः**—पाहिलेंत कसें नेमके निवडून आले ते! लंबेअली, मुडदेअली, गट्टुलाल, न्हावी, परीट, धेनुवल्लभ! बसा आतां शास्त्रीबोवा शंख करीत! एका तरी–एका तरी पदवीधराला झाला का विटाळ निवडून येण्याचा?

**पांडोबाः**—अहो, मतांची खैरातच अशी लुटमार लुटवली आहे, की या मतांच्या लुटमारींत, गाढवांचेंच स्वराज्य झालें पाहिजे आणि दुगाण्यांच्या धडाक्यानें शहाण्यांना पळता भुई थोडी झाली पाहिजे!

**डॉक्टरः**—कांहीं हरकत नाहीं. शहाणे तर निदान ठरलेना?

**पांडोबाः**—हो तर! लादलाच गेला आरोप जबरीनें तुमच्यावर! त्याला काय उपाय? (इतक्यांत महार व पोलिस ऑफिसर येतो. सर्वजण म्हणतात 'हें काय नवीन अरिष्ट! हें काय लचांड!')

**पोलिस ऑफिसरः**—अहो पोलिंग ऑफिसर! तुमच्या मतदारांच्या याद्या आणा पाहूं! ह्या केव्हां तयार झाल्या?

**पोलिंग ऑफिसरः**—१९२४ डिसेंबर अखेरपर्यंत तयार झालेल्या आहेत! ह्या घ्या! तसेंच हें पहा सरदार धेनुवल्लभ यांच्या मतांच्या पेटींत हें पुडकें त्यांच्या खदस्तुरच्या सहीशिक्यानें दिसत आहे, तें ताब्यांत घ्या!

**पांडोबाः**—आतां काय करावें या बैलोबाला! अहो सरदार, हें काय केलेंत! अहो, मला तर विचारायचें?

**धेनुवल्लभः**—मी स्वतः पाकिटांत घालून सही करून आलों. तुला त्याची काळजी नको! मी खात्रीनें निवडून आलों. जा तूं ताबडतोब! त्यांना हाक मारून, अत्तरगुलाब वांटायला घ्या! अहो पोलिस ऑफिसर!

**पोलिस ऑफिसरः**—चूप बसा! ( पुडकें फाडून काढतो ) कोण आहेरे, ह्यांना कैद करा! ( पोलिस कैद करतात ) काय हो पोलिंग ऑफिसर, जानेवारी फेब्रुवारी १९२५ सालांत हीं माणसें दहा मेलेलीं आहेत, त्यांचें व्होटिंग झालेलें आहे कीं काय तें पहा! कायरे बेशरम! ह्या नोटा कुणी दिल्या! बोल लवकर! नाहींतर पाठच फोडतों!

**महारः**—ह्या सुइणीनें दिल्या! पिऱ्याच्या नांवानें सही करून कागद घालायला लावला त्यांनीं!

**पोलिस ऑफिसरः**—आणखी किती असामी आहेत! कायहो दहा असामींचें व्होटिंग झालें आहे का?

**महारः**—चारजण आहेत! चला दाखवितो! मी कशाला खोटें बोलूं?

**पोलिंग ऑफिसरः**—सुपरिंटेंडंटसाहेब, या दहांपैकीं आठ असामींचीं मतें पडलीं आहेत!

**गट्टुलालः**—अरे भाई जाणादो! दोनसों तीनसों तुमभी वांट लेणा! जाणादो! ए तो खुल्लो शवदो है!

**पोलिस ऑफिसरः**—पोलिस, ह्याला बेडी घाल! हें तुमचें वारंट! तेवढा दरवाज्यांतून चोरीचा माल मिळवलेला बऱ्या बोलानें काढा; नाहींतर बच्चाराम आत्तां तिन्ही शेंड्या उपटून हातांत देईन! पोलिंग ऑफिसर, सर्व पेट्या पुनः मोहोरबंद करून सरकारांत रवाना करा! हें इलेक्शन रद्द झाल्याचा हा सरकारी हुकूम जाहीर करा!

**गट्टुलालः**—अरे मारा बाप! अमितो मरीगयो! विलक्षणमें १० हजीयारको ठार हुइ गयो! और वारंटमें जेलखाना सात बरस जाईयो! अरे मरीगयो!

**कोकिलाः**—अहो फौजदार, मला सोडवाहो! तुमच्या पाया पडतें!

**पोलिस ऑफिसरः**—चूप बदमाष! दुसऱ्यांच्याइकडे बाळंतपणांत तुम्ही कशा लोकांच्या गळ्याला फास लावतां, उन्मत्तपणानें झिडकारतां,

मला ठाऊक आहे ! आतां तुमच्या या खटल्याचें बाळंतपण माझ्याकडे आहे ! भोगा आतां केल्या कर्मांचीं फळें !

**कपिलाः**—( माळ घेऊन येते व चकित होते ) अगबाई हें काय ! अहो, यांना सोडाहो ! मी पदर पसरते ! हे निरपराधी आहेत, यांना सोडवाहो ! मला एवढी भीक घाला !

**धेनुवल्लभः**—हें माझें नशीब ! ही माझी साडेसाती ! परमेश्वरा ! सर्वस्वी नागवलों ! मूर्खासारखा ह्या बाह्यात्कारी दंभाला लालचावलों ! ह्या स्वार्थसाधू हरामखोरांच्या नादानं पदव्या, कीर्ति व डामडौलाच्या भरीस पडून लोककल्याणाच्या पवित्र कामाचा आंव घातला ! आम्हांला नुसता ठाकठिकीनें घरचा संसार करतां येईना; ते बेशरमपणानें, स्वार्थाच्या बुद्धीनें, बडेजावीच्या लालचीनें, नानाप्रकारच्या पांघरुणाखालीं दडून, लोककल्याणाचे आम्ही बहुरूपी, गांवाच्या संसाराकडे धांवलों.

**पोलिस ऑफिसरः**—चला लवकर ! गरीब बिचारा ह्या कावेबाज लोकांच्या नादानं बुडाला !

**धेनुवल्लभः**—लोकहो हंसूं नका ! माझी कींव करा ! मी ह्यांत स्वार्थ साधण्याच्या नादानें पडलों नाहीं, उलट सर्वस्वी बुडालों आहे !

**पांडोबाः**—तुम्ही कशाला लोकांच्या गयावया येतां ! सज्जनहो ! थांबा. तुम्हांला अत्यंत नम्रपणानें विनंति करून विचारतों कीं अहो, हंसतां कुणाला ? ९॥ वाजल्यापासून २॥ वाजेपर्यंत ५ तास हा पंचविस फूट लांबीचा आणि वीस फूट उंचीचा बिलोरी आरसा तुम्हां आबालवृद्धांच्या पुढें धरला होता, हे नाहीं का उमगलें तुम्हांला ? कुणाला हंसतां ? तुमचे तुम्हांलाच ? या ठिकाणीं ब्राह्मण, शूद्र, मुसलमान, पार्शी, धेड, बेरड, वगैरे जातवार राखीव जागा पाहिजेत कशाला ? खरोखर विद्वान्, अनुभवी आणि लोककल्याणाची कळकळ बाळगणारा जो निःस्वार्थी असेल, त्याचेंच इथें काम आहे ! राखीव जागा आणि मापीव तोबरे कशाला हवेत ! सामर्थ्य, शक्ति आणि सत्ता, हीं निरंतर ज्ञानाच्याच स्वाधीन ठेवलीं पाहिजेत ! सत्याच्या हातून-ज्ञानाच्या हातून-जेव्हां सत्ता, सामर्थ्य, शक्ति, हे असे निर्बुद्ध अडाणी, अक्षरशत्रु ठोंबे हिसकावून आपणाकडे घेऊं लागतात तेव्हां तीं तीं शहरें, ते ते प्रांत, ते ते देश धुळीस

मिळाल्याशिवाय कधींही रहात नाहींत. जोंपर्यंत तुम्हीं आपआपल्या सदसद्विवेकबुद्धीशीं युद्ध पुकारलें आहे, व्यवहारज्ञान तारतम्याशीं वैर करून, स्वार्थसाधू बहुरुप्यांच्या लोभाला, स्तुतीला, मोहाला, भिडेला पडून तुमच्यांतील निवडक कपिला-धेनुवल्लभ तुमच्या गांवच्या संसारांत निवडून पाठवितां आहांत तोंपर्यंत तुमच्या स्थानिक स्वराज्याचा गाडा असाच माळरानांतून सैरावैरा धडपडत पडून मोडायचा! हंसूं नका! या गोष्टीची सर्वत्रांना खंत वाटली पाहिंजे! किळस वाटली पाहिंजे!

**पोलिस ऑफिसरः**—चलो पोलीस, सबकू निकालो.

**पांडोबाः**—अहो, थांबा आलांत का आपल्या दंडुकेशाहीच्या जोरांत! हा आरसा आहे! तेव्हां आरसाच बंद करूं म्हणजे झालें.

**धेनुवल्लभः**—बरें तर, आपल्या नाटककर्त्याच्या लहरीप्रमाणें सर्व उभे राहून परमेश्वराची करुणा भाकूं! नंतर या रंगभूमीच्या आरशाला अवसणी घालूं!

[ सर्वजण ओळीनें उभे राहून कोरस म्हणतात. ]

**कोरस**

**पारतंत्र्य–पंकांतुनि देश सोडवावा।**
**हिंददेश माझा जीवप्राण माझा ॥ धृ० ॥**
**ज्ञानदीप उजळोनि मार्ग दाखवावा**
**सत्य, प्रेम, ऐक्य, यांत लोक लोभवावा ॥ १ ॥**

समाप्त